






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

वर्ष ३२ । अंक २ । उन्हाळा (एप्रिल) २०१४
विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक (Refereed journal)

# भाषा आणि जीवन

अपेक्षांची चार सुखं त्याच्याभोवती पहाटेपासून
फिरत होती. त्यांना त्यानं चिमटीत चिरडलं
आणि वाहत्या गटारात टाकून दिलं. त्यांची
प्रेतं घाणीच्या कडेवर बसून सुदूरपर्यंत
वाहत गेलेली त्यानं पाहिली.

हे उंचच उंच इमले, ही घरं, ही ऑफिसं,
ही हॉटेलं, सलूनं, दुकानं-
चमचम करणारी ही संस्कृति मंडळं,
या साहित्य परिषदा । ते सांस्कृतिक कुंटणखाने...
या वेश्यावस्त्या आणि हे सांस्कृतिक शाळाकॉलेजं,...
ही विद्यापीठं आणि ही हिंदुस्तान देश
अखंड! किती समृद्ध हा हिंदुस्तान देश
आणि उमदे, आनंदी, निश्चिंत त्यातील
स्त्रीपुरुष!
किती विस्तीर्ण आपल्या संस्कृतीचा सनातन
ओघ!
चला, आपण आता त्या सांस्कृतिक ओघात
ओंजळ बुडवून त्या मध्यरात्री मारलेल्या सुखांना
तर्पण करावं.
सुखाय स्वाहा ।
सुखाय इदं न मम॥
आता थोडं स्वतःला तर्पण करावं.
आत्मने स्वाहा। आत्मने इदं न मम॥
आता थोडं धर्माधर्मांना.
धर्माय स्वाहा। धर्माय इदं न मम॥

— ह.मो. मराठे

(निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी मधून)



मराठी अभ्यास परिषद पत्रिका



अनुक्रमणिका

संपादक : प्र० ना० परांजपे

संपादन-समिती : प्र० ना० परांजपे (प्रमुख), सरोजा भाटे, आनन्द काटीकर, विजय पाध्ये, विजया चौधरी

संपादकीय पत्रव्यवहार : प्र० ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, औंध, पुणे 411 007. संपर्क : (020) 2569 4617 ई-पत्ता : pranaparanjpe@gmail.com

प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता : आनन्द काटीकर, बी-5/16, सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411 051. चलभाष 094216 10704

मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : चित्तरंजन भट - 095459 50808 विजय पाध्ये - 098220 31963.
marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) वार्षिक वर्गणी

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| संस्था : | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/- = ₹ २,१००/-**. आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरात दर :** पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/-, शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक : हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै), दिवाळी (ऑक्टोबर).
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांतील/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**



अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

## परिषद वार्ता

[अ] मराठी अभ्यास परिषद : कार्यकारी मंडळाची पंचवार्षिक निवडणूक : २०१४

मराठी अभ्यास परिषदेची पंचवार्षिक निवडणूक मार्च २०१४मध्ये पूर्ण झाली.

मार्च २०१३पूर्वी मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सभासद असणारे सभासदच निवडणुकीला उभे राहू शकत होते. डॉ० अरविंद नवरे यांनी निवडणूक अधिकारी म्हणून काम पाहिले.

मंगळवार, दि० १८ फेब्रुवारी, २०१४ पर्यंत उमेदवारी अर्ज भरण्याची मुदत होती. निर्धारित मुदतीमध्ये पुण्यातील ७ सभासद आणि पुण्याबाहेरील २ सभासद यांनी अर्ज भरले. शनिवार, दि० २२ फेब्रुवारी, २०१४पर्यंत कोणीही अर्ज मागे न घेतल्यामुळे, जेवढ्या जागा तेवढेच उमेदवार अशी स्थिती झाली. त्यामुळे एप्रिल २०१४ ते मार्च २०१९ या पाच वर्षांच्या काळासाठी मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळावर पुढील सभासद बिनविरोध निवडून आल्याची घोषणा निवडणूक अधिकारी डॉ० अरविंद नवरे यांनी केली.

(अ) पुणे म०न०पा० हद्दीतील सभासद -
(१) प्रा० प्र०ना० परांजपे (२) डॉ० सरोजा भाटे (३) डॉ० आनन्द काटीकर (४) विजया चौधरी (५) विजय पाध्ये (६) डॉ० प्रमोद तलगेरी (७) सलील वाघ

(आ) पुणे म०न०पा० हद्दीबाहेरील सभासद -
(१) डॉ० गंगाधर नामगवळी, उदगीर, लातूर. (२) डॉ० प्रभाकर जोशी, अमळनेर, जळगाव.

(इ) स्वीकृत सभासद -
(१) डॉ० कल्पना कुलकर्णी, पुणे.
(२) डॉ० श्री०मा० भावे, पुणे.

[आ] पदाधिकारी

मराठी अभ्यास परिषदेच्या नवनिर्वाचित सभासदांची बैठक रविवार, दि० ३० मार्च २०१४ ला झाली. या बैठकीत आगामी पाच वर्षांसाठी पुढील पदाधिकारी निवडण्यात आले :

अध्यक्ष : प्रा० प्र०ना० परांजपे
उपाध्यक्ष : डॉ० सरोजा भाटे
कार्यवाह : डॉ० आनन्द काटीकर
सह-कार्यवाह : विजय पाध्ये
कोषाध्यक्ष : विजया चौधरी

[इ] संस्थेचा **नवीन पत्ता :**

मराठी अभ्यास परिषद,
द्वारा : डॉ० आनन्द काटीकर, बी-5/16, सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411051. चलभाष क्र० 94216 10704.

[ई] संपादक आणि संपादन मंडळ :

आगामी काळासाठी 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका - भाषा आणि जीवन'चे संपादक म्हणून प्रा० प्र०ना० परांजपे हे काम पाहतील. संपादक मंडळाचे सभासद म्हणून डॉ० सरोजा भाटे, डॉ० आनन्द काटीकर, विजय पाध्ये आणि सलील वाघ काम करतील.

पत्रव्यवहारासाठी संपादकांचा पत्ता :

प्रा० प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, औंध, पुणे 411007. चलभाष क्र० 094225 09638 स्थिरभाष क्र० 020-25694617



अनुक्रमणिका

संपादकीय

# मराठी भाषेची अ-श्वेतपत्रिका

- प्र०ना० परांजपे

ब्रिटिश इंग्लिशमध्ये 'व्हाइट पेपर' व 'ग्रीन पेपर' अशा दोन संज्ञा आहेत. पैकी 'ग्रीन पेपर' म्हणजे सर्वसाधारण चर्चेसाठी सरकारने मांडलेल्या सूचनांचा अहवाल. आणि 'व्हाइट पेपर' म्हणजे पार्लमेंटमध्ये चर्चा होणार असणाऱ्या विषयासंबंधीचे आपले धोरण मांडणारा सरकारचा अहवाल याचा अर्थ असा की 'ग्रीन पेपर' म्हणजे धोरण ठरवण्यापूर्वीचा प्राथमिक अहवाल आणि 'व्हाइट पेपर' म्हणजे धोरण ठरवल्यानंतरचा अंतिम अहवाल. आपण मात्र फक्त 'व्हाइट पेपर' हीच संज्ञा स्वीकारली आणि तिचे भाषांतर 'श्वेतपत्रिका' असे केले. अर्थात या 'पांढऱ्या कागदा'त सर्व काही धुतल्या तांदळासारखे पांढरे -'श्वेत'- असतेच असे नाही, हे अलिकडेच महाराष्ट्राच्या विधिमंडळाला सादर करण्यात आलेल्या सिंचनासंबंधीच्या श्वेतपत्रिकेवरून आपल्या लक्षात आलेच आहे.

सरकार 'श्वेतपत्रिका' काढत असेल तर सरकारचा नाकर्तेपणा दाखविणारा एखादा 'काळा अहवाल' म्हणजे 'अ-श्वेतपत्रिका' आपण का प्रकाशित करू नये, असा विचार ठाण्याच्या 'मराठी अभ्यास केंद्र' या संस्थेला सुचला आणि त्यांनी तो गेल्या वर्षी अमलातही आणला. हा अहवाल आहे मराठी भाषेबद्दलच्या सरकारच्या उपेक्षेचा, असमंजसपणाचा व निगरगट्टपणाचा! पदरचे आठ-दहा लाख खर्च करून मराठी अभ्यास केंद्राने या अहवालाच्या पाचशे प्रती छापल्या, विधिमंडळाच्या सर्व सभासदांना, माध्यम-संस्थांना, मराठीबद्दलच्या सरकारी संस्थांच्या सभासदांना पाठवल्या. पण परिणाम शून्य! बहुतेकांनी अहवालाची दखलही घेतली नाही. मराठी भाषेच्या प्रश्नाशी संबंध असणाऱ्या सर्वांची ही अनास्था पाहिली की सचोटीच्या व तळमळीच्या कार्यकर्त्यांना नैराश्य येऊन ते निष्क्रीय होतील अशी भीती वाटते.

म्हणून या संपादकीयाद्वारे 'भाषा आणि जीवन'च्या सुशिक्षित, विचारी व सजग वाचकांपर्यंत या श्वेतपत्रिकेची माहिती पोचवण्याचा हा प्रयत्न.

प्रामुख्याने मराठी अभ्यास केंद्राच्या रेट्यामुळे २०१० मध्ये मराठी भाषा विभागाची स्थापना महाराष्ट्र शासनाने केली. पण या विभागाचे स्वरूप काय असावे, त्याची रचना कशी असावी, त्याने कोणती कामे कोणत्या प्राधान्यक्रमाने करावीत याविषयी शासनाला काही स्पष्ट कल्पना होती असे दिसत नाही. त्यामुळे सरकारला हे सर्व समजावण्याची जबाबदारीच जणू मराठी अभ्यास केंद्राने स्वत:हून स्वीकारली.

पण सरकारबाहेरील, ‘सरकारमान्य’ नसणाऱ्या कुणाचे सरकार कसे ऐकणार? म्हणून अभ्यास केंद्राने विविध उपायांचा अवलंब केला. त्या सगळ्या प्रयत्नांचा अहवाल आणि त्याच्याशी संबंधित सगळे दस्तावेज म्हणजे ही ‘मराठी भाषेची अ-श्वेतपत्रिका.’

या पत्रिकेची भूमिका डॉ० दीपक पवार यांनी प्रारंभी मांडली आहे. त्यानंतर आनंद भंडारे यांनी लिहिलेले ‘माहिती अधिकारात माहिती मिळवताना’ हे (बिनक्रमांकाचे) प्रकरण अतिशय उद्‌बोधक आहे. ते सार्वजनिक क्षेत्रात काम करणाऱ्या कुठल्याही कार्यकर्त्याला मार्गदर्शक ठरेल. माहितीच्या अधिकाराचा कायदा झाला खरा; पण माहिती मिळवताना येणाऱ्या अनंत अडचणी, मंत्रालयात घालाव्या लागणाऱ्या खेपा आणि शासकीय सेवकांची मख्ख उत्तरे, त्यापेक्षाही त्यांचे मख्ख चेहरे यांना तोंड देऊन भंडाऱ्यांनी मिळवलेली माहिती सरकारच्या वेळकाढूपणावर व नाकर्तेपणावर झगझगीत प्रकाश टाकते.

साहित्य-संस्कृति-मंडळ व राज्य मराठी विकास संस्था यांचे एकत्रीकरण करण्याचा घाट सरकारने घातला होता. वृत्तपत्रीय बातम्यांतून त्या बेताचा सुगावा लागताच मराठी अभ्यास केंद्राने त्याच्या विरोधात मोहीम उघडली. पत्रे, भेटीगाठी, वृत्तपत्रीय लेख व बातम्या अशा उपायांनी त्यांनी जनमत जागे केले आणि तो बेत रद्द करायला सरकारला भाग पाडले. या आंदोलनाशी संबंधित सर्व कागदपत्रे, लेख, बातम्या एकत्र वाचताना मराठी अभ्यास केंद्राने हा लढा कसा उभा केला याची कल्पना येते आणि अभ्यास केंद्राचे कौतुक वाटल्याखेरीज राहात नाही.

‘विधिमंडळात मराठीचा आवाज’ या प्रकरणात विधिमंडळात मराठीबद्दल झालेल्या चर्चांचे वृत्त सविस्तर वाचायला मिळते. एरवी वर्तमानपत्रांत हे वृत्त अत्यंत त्रोटक स्वरूपात येते, त्यामुळे लोकप्रतिनिधींना मराठीबद्दल काय वाटते हे आपल्यापर्यंत पोचू शकत नाही.

या पत्रिकेतील एका प्रकरणाचे नाव आहे ‘‘सावधान- धोरणलकवा सुरू आहे.’’ हे वर्णन सरकारच्या भाषाविषयक सर्वच कृतींना व धोरणांना लागू पडते. संस्थांवर नेमणुका करायच्या नाहीत, पुरेसा सेवकवर्ग द्यायचा नाही, दोनदोन वर्षांत बैठका घ्यायच्या नाहीत, भाषेच्या विकासात कोणत्या गोष्टी अनुस्यूत आहेत हे समजावून घ्यायचे नाही, सभासदांच्या नेमणुका करताना लायकीपेक्षा जात, प्रदेश, लागेबांधे यांनाच महत्त्व द्यायचे - हे आहे शासनाचे भाषाविषयक धोरण! ज्या भाषेच्या वाट्याला असे शासक येतात त्या भाषेला ‘अभिजात’ म्हणून मान्यता कशी मिळणार आणि चुकून ती मिळालीच तर त्या भाषेला ती कशी पेलवणार!

या अ-श्वेतपत्रिकेचे लेखक डॉ० दीपक पवार यांना मराठी अभ्यास परिषदेने १ मे रोजी व्याख्यान देण्यासाठी आमंत्रित केले होते. त्यांच्या भाषणातही निराशेचा सूर उमटला होता. पण प्रयत्न करत राहाण्यापेक्षा दुसरे काही करता येत नाही हे त्यांचे (व त्यांच्या सारखेच काम करणाऱ्या इतरांचे) भागधेय आहे! ■





अनुक्रमणिका

# मराठीत वारंवार येणारे शब्द आणि अक्षरे

- कल्याण जोशी आणि मनोहर राजर्षि

## (१) प्रास्ताविक

मराठीत कोणते शब्द जास्त वेळा येतात, याचा शोध घेणारा पहिला अभ्यास डॉ० श्री०वा० भागवत ह्यांनी केला. त्यांनी हे काम डॉ० सुमंत कत्रे यांच्या मार्गदर्शनाखाली केले आणि ह्या कामाबद्दल त्यांना पुणे विद्यापीठाची पीएच०डी०पदवी देण्यात आली. ते काही काळ डेक्कन कॉलेजचे कुलसचिव होते, तसेच नागपूर विद्यापीठाचे उपकुलसचिव होते. डॉ० कत्रे त्या वेळेस केंद्रीय सरकारच्या शिक्षण खात्याच्या एका समितीचे सभासद होते. डॉ० कत्रे यांनी त्या समितीस सुचवले की अशा प्रकारचे अभ्यास भारतीय भाषांविषयी होणे इष्ट असून त्या भाषांसाठी जलद-लेखन प्रणाली तयार करण्यास हे काम निश्चितच उपयोगी ठरेल. त्यामुळे त्यांनी भागवतांना असे काम मराठीसाठी करायला सांगितले. हे काम १९६०च्या सुमारास पूर्ण झाले.

गेली काही वर्षे संगणक आणि संख्याशास्त्र यांच्या साहाय्याने भाषांचा फार मोठ्या प्रमाणावर अभ्यास होत आहे. भाषिक अभियांत्रिकी किंवा नैसर्गिक भाषा-प्रक्रिया (नॅचरल लँग्वेज प्रोसेसिंग) अशासारख्या नव्या विद्या-शाखा निर्माण झाल्या आहेत. त्या पार्श्वभूमीवर भागवतांच्या कामाचे महत्त्व ऐतिहासिक दृष्ट्या अधिकच आहे. संगणकावर आधारलेल्या यांत्रिक आणि जलद भाषांतरप्रणाली, कळ-फलकाची आखणी, संभाषणाची भाषा ओळखणे, संगणकाच्या द्वारा मुद्रित-शोधन अशा अनेक गोष्टींसाठी असे शब्द-संग्रह वापरले जात आहेत. हल्लीच्या शब्द-संग्रहात संपूर्ण वाक्ये उपलब्ध असतात, अर्थात भागवतांच्या काळातल्या संगणकांच्या उपलब्धतेच्या मर्यादा लक्षात घेता, त्यांच्या संग्रहाकडून अशी अपेक्षा बाळगणे योग्य होणार नाही.

आपल्या मातृभाषेत, वेगवेगळे शब्द, वेगवेगळी अक्षरे किती वेळा येतात, कोणती अक्षरे अथवा कोणते शब्द सगळ्यात जास्त वेळा येतात, असे प्रश्न निव्वळ उत्सुकतेपोटीही पडू शकतात. आपल्या भाषेचे वेगवेगळे पैलू त्यामुळे आपल्या ध्यानात येतात, या प्रकारच्या अभ्यासाचा नि संग्रहांचा प्रत्यक्ष उपयोग कसा होऊ शकतो, त्याचे काहीसे दिग्दर्शन पुढे केले आहे.

(२) भाषिक संग्रह

आपल्या अभ्यासासाठी मजकुराची निवड भागवतांनी पुढीलप्रमाणे केली होती. वर्तमानपत्रे आणि नियतकालिके (६०,००० शब्द), कथा-कादंबऱ्या (३०,००० शब्द) आणि पाठ्यपुस्तके-बालवाङ्मय (१५,००० शब्द) असे सुमारे १,०५,००० शब्द त्यांच्या संग्रहात आहेत. कथा-कादंबऱ्यांच्या बाबतीत लेखकांचे वर्गीकरण स्त्रिया (१२,५०० शब्द) आणि पुरुष (१७,५०० शब्द) असे आहे. पुस्तके, वर्तमानपत्रे इत्यादींची यादी त्यांच्या पुस्तकात दिलेली आहे. त्या काळातल्या गद्य आणि लिखित मराठीचे प्रातिनिधिक रूप आपल्या अभ्यासासाठी निवडण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. अगदी क्वचितच येणारे परकी भाषांतले शब्द वगळून त्यांनी ९९,९८० शब्दांच्या साहाय्याने आपले विश्लेषण मांडले आहे. ('भाषा आणि जीवन'च्या दिवाळी २०१३च्या अंकातील प्र०ना० परांजपे यांच्या संपादकीयात त्यांनी आणखी काही तपशील दिले आहेत, ते जरूर बघावेत.)

या संदर्भात झिप्फ (झिप्फ(१९३२)) या अमेरिकी भाषा-अभ्यासकाचा उल्लेख करणे आवश्यक आहे. आपण एखाद्या भाषेत सगळ्यात जास्त वेळेला येणारा शब्द, त्याखालोखाल येणारा शब्द... अशी जंत्री केली, म्हणजेच त्यांच्या घटत्या वारंवारतेनुसार त्यांची क्रमवारी लावली, तर झिप्फचा सिद्धांत असे सांगतो की, एखाद्या शब्दाची क्रमवारी आणि त्याची वारंवारता यांचा गुणाकार स्थिरांक असतो. वेगळ्या शब्दांत सांगायचे झाले तर पहिला शब्द जर १००० वेळा येत असेल, तर दुसरा शब्द ५०० वेळा येईल, तिसरा शब्द ३३३ वेळा येईल... वगैरे. म्हणजे शब्दाचा क्रम आणि त्याची वारंवारता यांचा गुणाकार साधारणपणे १०००च राहतो. पहिल्या काही शब्दांसाठी हा सिद्धांत काहीसा योग्य वाटतो; पण तौलनिक दृष्ट्या दुर्मीळ शब्दांना तो लागू होत नाही असे अनेक अभ्यासकांनी नोंदवले आहे. झिप्फच्या सिद्धांतात संख्याशास्त्रीय पद्धतीने सुधारणा करण्याचे प्रयत्न झाले आहेत, त्यातले काही प्रयत्न क्रमवारी-वारंवारता यांचा संबंध, विशेषतः पहिल्या काही शब्दांच्या बाबतीत, योग्य रीतीने स्पष्ट करतात, असे आढळून आले आहे. हा संख्याशास्त्रीय भाग सोडला, तर एखाद्या भाषेतले पहिले काही शब्द वगळता, जवळजवळ सगळेच शब्द सारख्याच प्रमाणात दुर्मीळ आहेत हा या सिद्धांताचा गाभा आहे, असे भाषाशास्त्रज्ञ मानतात. ही दुर्मीळता आम्ही दिलेल्या आकडेवारीवरून दिसून येईलच. झिप्फ आणि भागवत यांनी त्यांच्या याद्या करताना अफाट कष्ट घेतले, त्यांचे वर्णन त्यांच्या पुस्तकांत आले आहे. तुलनेने अशा याद्या करण्याचे आमचे काम संगणकाच्या साहाय्याने काहीसे सोपे होते.

आम्ही अभ्यासासाठी निवडलेले संग्रह, समाविष्ट झालेल्या मजकुराची शब्दसंख्या आणि त्यातल्या भिन्न शब्दांची संख्या इ० बाबी खाली दिल्याप्रमाणे आहेत. क्रमांक २,३ आणि ४ हे शब्दसंग्रह आणि त्यांच्या वारंवारता आम्ही तयार केल्या आहेत.

( १ ) भागवत-संग्रह (१९६०). एकूण शब्दसंख्या ९९९८०, त्यातले विभिन्न शब्द २५,१४७ [संदर्भ : भागवत (१९६१)].

( २ ) ई-वर्तमानपत्रे (२०१२). हा संग्रह आम्ही माहितीजालात उपलब्ध असलेला मजकूर वापरून केला आहे. त्यात प्रामुख्याने माहितीजालातली वर्तमानपत्रे आहेत. यात दैनिक 'सकाळ'च्या पुणे आवृत्तीचा (२०१२) समावेश जास्त प्रमाणावर आहे. एकूण शब्दसंख्या ७,२१,१४२. त्यातले विभिन्न शब्द १,०९,४९८:

( ३ ) मराठी विश्वकोश - मराठी विश्वकोशाचे पहिले १७ खंड. एकूण शब्दसंख्या सुमारे २९,६७,८८५. त्यातले विभिन्न शब्द २,४७,८२१.

( ४ ) विकिपीडियात मराठीतून दिलेल्या नोंदी (२०१२). एकूण शब्दसंख्या ११,६७,७८२. त्यातले विभिन्न शब्द १,०८,४२२.

( ५ ) लेक्झेटिरिया (२०१०). एकूण शब्दसंख्या १३,५१,६३५६. त्यातले विभिन्न शब्द १,६५,२७२. (संदर्भ : www.lexiteria.com)

लेक्झेटिरियाच्या संकेतस्थळावर त्यांच्या संग्रहावरून तयार केलेल्या पहिल्या २०१ शब्दांची यादी त्यांनी दिली आहे. त्यांचा संग्रहही माहिती-जालावर उपलब्ध असलेल्या मजकुरावर आधारित आहे. त्यात विकिपीडियामधील मजकूर, ई-वर्तमानपत्रे आणि ब्लॉगवरील मजकूर हेच प्राबल्याने असण्याची शक्यता आहे. त्यासंबंधीची अधिक माहिती उपलब्ध नाही. ह्या संग्रहाचा ई-वर्तमानपत्रे आणि विकीपीडिया या संग्रहांशी निकटचा संबंध आहे. विभिन्न शब्दांची सगळ्यात जास्त संख्या विश्वकोशातील आहे, हे स्वाभाविकच आहे.

### (३) जास्त वारंवारता असलेले शब्द

वर दिलेल्या शब्दसंग्रहांची शब्दसंख्या मोठी असली, तरी त्यांच्या शब्द-वारंवारतेचे स्वरूप भिन्न आहे. उदाहरणार्थ, विकिपीडियात चित्रे, जन्म, मृत्यू, इ०स०, क्षेत्रफळ असे शब्द जास्त वेळा येतात. वर्तमानपत्रांमधे मुंबई, नागपूर, पुणे अशी शहरांची नावे, मुख्य मंत्री, उपमुख्यमंत्री, केंद्र सरकारमधले मराठी मंत्री, राज्यातले मंत्री, आमदार आणि इतर स्थानिक पुढारी यांची आडनावे स्वाभाविकपणे जास्त वेळा येतात. असे शब्द वगळून ह्या पाच संग्रहात जे शब्द पहिल्या २०० क्रमांकांवर आहेत त्यांची यादी पहिल्या तक्त्यात दिली आहे. हा तक्ता असा वाचावा : 'हा' हा शब्द वर्तमानपत्रांच्या संग्रहात सर्वात जास्त वेळेला येतो, तर भागवतांच्या संग्रहात त्याचा क्रम विसावा आहे. विश्वकोशात त्याचा क्रम पाचवा आहे. लेक्झेटेरियामध्ये पहिले २०० शब्द दिलेले असल्याने काही शब्दांचा त्यांच्या यादीतला क्रम उपलब्ध नाही. त्यांच्या यादीत दिलेले * हे चिन्ह त्या शब्दाचा क्रम २०१ किंवा त्यापेक्षाही खाली आहे, हे दर्शवते.

## तक्ता क्रमांक १

### सगळ्यात जास्त वेळा येणारे पहिले दोनशे शब्द

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकीपीडिया | लेक्झोटेरिया |
|---|---|---|---|---|---|
| हा | 1 | 20 | 5 | 8 | 13 |
| आहे | 2 | 1 | 6 | 1 | 1 |
| आणि | 3 | 4 | 1 | 3 | 3 |
| व | 4 | 2 | 4 | 2 | 5 |
| ते | 5 | 8 | 11 | 15 | 12 |
| यांनी | 6 | 105 | 2 | 66 | 14 |
| त्यामुळे | 7 | 89 | 3 | 81 | 52 |
| या | 8 | 5 | 9 | 5 | 2 |
| नाही | 9 | 3 | 7 | 22 | 6 |
| केली | 10 | 58 | 8 | 34 | 22 |
| आले | 11 | 43 | 12 | 71 | 46 |
| केले | 12 | 50 | 16 | 28 | 26 |
| सुरू | 13 | 101 | 13 | 82 | 41 |
| यांच्या | 14 | 162 | 14 | 102 | 83 |
| त्यांना | 15 | 42 | 19 | 93 | 89 |
| तर | 16 | 9 | 10 | 19 | 11 |
| झाला | 17 | 54 | 24 | 49 | 58 |
| करण्यात | 18 | 88 | 17 | 88 | 31 |
| हे | 19 | 7 | 20 | 4 | 9 |
| आहेत | 20 | 18 | 15 | 9 | 10 |
| येथील | 21 | 183 | 18 | 60 | 97 |

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकीपीडिया | लेक्झोटेरिया |
|---|---|---|---|---|---|
| मात्र | 22 | 91 | 22 | 107 | 49 |
| आज | 23 | 66 | 28 | 160 | 62 |
| अशी | 24 | 34 | 21 | 68 | 57 |
| त्यांनी | 25 | 38 | 27 | 67 | 54 |
| आली | 26 | 62 | 32 | 108 | 82 |
| ही | 27 | 19 | 36 | 10 | 25 |
| काही | 28 | 24 | 29 | 26 | 27 |
| येथे | 29 | 109 | 31 | 23 | 74 |
| घेतली | 30 | 197 | 40 | 200 | * |
| दिली | 31 | 117 | 25 | 170 | 100 |
| अशा | 32 | 32 | 30 | 63 | 93 |
| की | 33 | 14 | 38 | 59 | 43 |
| एक | 34 | 10 | 34 | 6 | 18 |
| होते | 35 | 16 | 23 | 12 | 16 |
| करून | 36 | 26 | 35 | 46 | 32 |
| यांना | 37 | 191 | 33 | 166 | 111 |
| जात | 38 | 109 | 37 | 97 | 131 |
| विविध | 39 | 249 | 51 | 105 | 155 |
| असून | 40 | 44 | 47 | 31 | 70 |
| दोन | 41 | 48 | 26 | 40 | 42 |
| त्या | 42 | 12 | 45 | 35 | 116 |





अनुक्रमणिका

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकिपीडिया | लेक्झेटेरिया |
|---|---|---|---|---|---|
| असलेल्या | 43 | 130 | 53 | 62 | 118 |
| पण | 44 | 15 | 58 | 58 | 28 |
| झाले | 45 | 36 | 54 | 48 | 47 |
| प्रमुख | 46 | 249 | 39 | 70 | * |
| त्यांच्या | 47 | 41 | 48 | 94 | 104 |
| देत | 48 | 154 | 81 | 247 | * |
| येत | 49 | 68 | 46 | 169 | 140 |
| कमी | 50 | 93 | 44 | 72 | 114 |
| तो | 51 | 11 | 49 | 42 | 53 |
| केला | 52 | 55 | 80 | 37 | 39 |
| असे | 53 | 6 | 52 | 14 | 17 |
| अनेक | 54 | 124 | 41 | 27 | 87 |
| असा | 55 | 44 | 42 | 61 | 80 |
| करण्यासाठी | 56 | 175 | 55 | 130 | 137 |
| अधिकारी | 57 | 180 | 158 | 206 | * |
| झाली | 58 | 39 | 87 | 65 | 55 |
| तीन | 59 | 130 | 56 | 89 | 94 |
| होती | 60 | 21 | 60 | 51 | 44 |
| अपेक्षा | 61 | 234 | 249 | 296 | * |
| आलेले | 62 | 220 | 61 | 236 | * |
| सांगितले | 63 | 162 | 99 | 211 | 107 |
| जरा | 64 | 186 | 279 | 279 | * |
| ती | 65 | 17 | 50 | 75 | 88 |
| त्यासाठी | 66 | 228 | 79 | 257 | * |

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकिपीडिया | लेक्झेटेरिया |
|---|---|---|---|---|---|
| आला | 67 | 65 | 94 | 118 | 99 |
| म्हणजे | 68 | 30 | 65 | 25 | 92 |
| पाच | 69 | 220 | 68 | 174 | 164 |
| तरी | 70 | 23 | 76 | 95 | 63 |
| होता | 71 | 26 | 64 | 32 | 48 |
| नवी | 72 | 202 | 96 | 243 | 123 |
| प्रत्येक | 73 | 123 | 123 | 114 | * |
| एका | 74 | 47 | 66 | 52 | 81 |
| असल्याने | 75 | 175 | 75 | 129 | 163 |
| सुरुवात | 76 | 253 | 296 | 252 | * |
| न | 77 | 49 | 62 | 73 | 73 |
| पोलीस | 78 | 242 | 293 | 256 | 120 |
| व्यक्त | 79 | 191 | 302 | 302 | 185 |
| राज्य | 80 | 207 | 70 | 38 | 161 |
| होत | 81 | 55 | 100 | 76 | 86 |
| आपल्या | 82 | 28 | 71 | 55 | 89 |
| वेळी | 83 | 115 | 57 | 166 | 145 |
| म्हणून | 84 | 22 | 59 | 30 | 72 |
| असल्याचे | 85 | 210 | 95 | 198 | 127 |
| झालेल्या | 86 | 180 | 74 | 130 | 91 |
| गेल्या | 87 | 156 | 159 | 244 | 149 |
| असं | 88 | 152 | 42 | 277 | * |
| त्याचा | 89 | 79 | 69 | 110 | * |
| दिला | 90 | 126 | 117 | 148 | 160 |

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकिपीडिया | लेक्सेटेरिया |
|---|---|---|---|---|---|
| हजार | 91 | 215 | 97 | 219 | 102 |
| तारीख | 92 | 259 | 281 | 275 | * |
| त्यात | 93 | 68 | 88 | 142 | 177 |
| चार | 94 | 167 | 85 | 125 | 171 |
| अधिक | 95 | 81 | 90 | 79 | 132 |
| सर्व | 96 | 46 | 134 | 50 | 84 |
| यांच्यासह | 97 | 259 | 300 | 299 | * |
| आता | 98 | 33 | 105 | 122 | 37 |
| तसेच | 99 | 136 | 78 | 39 | 98 |
| डॉ | 100 | 259 | 67 | 180 | 106 |
| भारतीय | 101 | 173 | 102 | 16 | 101 |
| त्यानंतर | 102 | 234 | 115 | 181 | 193 |
| ज्या | 103 | 86 | 86 | 140 | * |
| देण्यात | 104 | 193 | 105 | 196 | 187 |
| तयार | 105 | 99 | 132 | 64 | 148 |
| करण्याचा | 106 | 182 | 114 | 219 | * |
| नाहीत | 107 | 72 | 84 | 162 | 142 |
| जास्त | 108 | 128 | 72 | 86 | * |
| किंवा | 109 | 55 | 83 | 20 | 116 |
| गेली | 110 | 116 | 108 | 155 | * |
| अर्थात | 111 | 225 | 217 | 205 | * |
| केवळ | 112 | 146 | 77 | 136 | 129 |
| करू | 113 | 95 | 135 | 181 | 154 |
| यांचा | 114 | 204 | 89 | 119 | * |

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकिपीडिया | लेक्सेटेरिया |
|---|---|---|---|---|---|
| लाख | 115 | 148 | 215 | 126 | 146 |
| माहिती | 116 | 157 | 63 | 54 | 79 |
| घेतला | 117 | 167 | 113 | 164 | * |
| प्रयत्न | 118 | 107 | 92 | 164 | 122 |
| गेला | 119 | 113 | 82 | 113 | * |
| चर्चा | 120 | 253 | 206 | 226 | * |
| स्पष्ट | 121 | 146 | 73 | 237 | * |
| करताना | 122 | 167 | 171 | 227 | * |
| परंतु | 123 | 31 | 93 | 96 | 153 |
| दाखल | 124 | 259 | 275 | 261 | * |
| करीत | 125 | 50 | 174 | 186 | 172 |
| जिल्हा | 126 | 159 | 223 | 13 | 112 |
| घेऊन | 127 | 61 | 136 | 154 | 144 |
| शेतकऱ्यांनी | 128 | 259 | 297 | 299 | * |
| असतात | 129 | 97 | 116 | 41 | * |
| काम | 130 | 77 | 136 | 106 | 85 |
| श्री | 131 | 82 | 205 | 132 | 151 |
| मध्ये | 132 | 228 | 91 | 33 | 115 |
| महापालिका | 133 | 259 | 299 | 291 | * |
| होणार | 134 | 142 | 244 | 267 | 109 |
| म्हणाले | 135 | 139 | 300 | 290 | 181 |
| काय | 136 | 25 | 107 | 135 | 61 |
| आलेल्या | 137 | 197 | 133 | 203 | * |
| दिले | 138 | 124 | 120 | 134 | 141 |

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकिपीडिया | लेक्सिकोटेरिया | शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकिपीडिया | लेक्सिकोटेरिया |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| का | 139 | 37 | 219 | 170 | 64 | भूमिका | 163 | 247 | 220 | 224 | * |
| अध्यक्ष | 140 | 241 | 237 | 214 | * | गेले | 164 | 75 | 160 | 103 | * |
| मोठ्या | 141 | 118 | 98 | 85 | * | उपस्थित | 165 | 259 | 265 | 288 | * |
| किमान | 142 | 259 | 251 | 209 | * | इतर | 166 | 118 | 129 | 44 | 110 |
| असताना | 143 | 157 | 163 | 177 | * | दिवस | 167 | 106 | 179 | 92 | 175 |
| मी | 144 | 13 | 141 | 36 | 68 | यासाठी | 168 | 253 | 177 | 216 | * |
| पुन्हा | 145 | 82 | 118 | 191 | 121 | एकदम | 169 | 175 | 245 | 291 | * |
| त्याला | 146 | 35 | 111 | 86 | 128 | सुमारे | 170 | 204 | 253 | 91 | * |
| निर्णय | 147 | 207 | 232 | 265 | 152 | प्रश्न | 171 | 101 | 259 | 234 | * |
| निर्माण | 148 | 90 | 109 | 109 | 157 | जाईल | 172 | 167 | 246 | 268 | * |
| येईल | 149 | 71 | 127 | 212 | * | टक्के | 173 | 247 | 302 | 302 | * |
| होईल | 150 | 60 | 201 | 224 | 135 | त्यांची | 174 | 86 | 128 | 150 | * |
| करण्याची | 151 | 157 | 175 | 189 | * | लक्ष | 175 | 148 | 202 | 230 | * |
| ठिकाणी | 152 | 121 | 154 | 114 | * | जाहीर | 176 | 197 | 261 | 198 | * |
| आपण | 153 | 59 | 216 | 120 | 105 | असते | 177 | 40 | 125 | 21 | 113 |
| केलेल्या | 154 | 215 | 112 | 153 | * | कधी | 178 | 112 | 212 | 222 | * |
| राजकीय | 155 | 204 | 203 | 80 | * | संख्या | 179 | 259 | 164 | 104 | * |
| कार्यक्रम | 156 | 215 | 243 | 252 | * | करतात | 180 | 130 | 143 | 78 | * |
| यांची | 157 | 142 | 104 | 162 | 199 | माजी | 181 | 259 | 267 | 263 | * |
| यांचे | 158 | 184 | 126 | 141 | * | त्याच्या | 182 | 72 | 119 | 90 | * |
| आपली | 159 | 121 | 181 | 194 | * | काळात | 183 | 234 | 121 | 99 | * |
| विशेष | 160 | 184 | 101 | 147 | 30 | सहा | 184 | 228 | 151 | 201 | * |
| दोन्ही | 161 | 142 | 103 | 128 | * | विचार | 185 | 68 | 150 | 156 | 133 |
| येणार | 162 | 139 | 252 | 288 | 179 | जाते | 186 | 134 | 122 | 18 | 174 |

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकीपीडिया | लेक्झेटेरिया | शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकीपीडिया | लेक्झेटेरिया |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| होऊ | 187 | 136 | 153 | 188 | * | करणाऱ्या | 194 | 202 | 124 | 249 | * |
| याचा | 188 | 154 | 165 | 116 | * | आदेश | 195 | 259 | 264 | 275 | * |
| सध्या | 189 | 220 | 182 | 195 | * | आर्थिक | 196 | 165 | 180 | 186 | * |
| बंद | 190 | 157 | 145 | 184 | * | किती | 197 | 53 | 196 | 241 | * |
| म्हटले | 191 | 148 | 200 | 184 | * | घेत | 198 | 212 | 234 | 262 | * |
| करणारे | 192 | 234 | 110 | 221 | * | दिलेल्या | 199 | 259 | 211 | 255 | * |
| होतो | 193 | 72 | 149 | 45 | * | आदी | 200 | 193 | 235 | 266 | * |

वरील शब्दांची क्रमवारी वेगवेगळ्या संग्रहांत जरी वेगवेगळी असली, तरी सर्वसाधारणपणे आणि संख्याशास्त्रीय दृष्ट्या ह्या क्रमवारींत फारसा फरक नाही. काही बदल पुढे नोंदवले आहेत.

(१) 'यांच्या', 'यांचा', 'यांनी' अशा शब्दांचे क्रम भागवत-संग्रहाच्या मानाने वर्तमानपत्रांच्या संग्रहात बरेच वर आहेत. 'पवारांनी', 'चव्हाणांचे', 'ठाकऱ्यांनी' असे शब्द-प्रयोग टाळण्याची वर्तमानपत्रांची प्रवृत्ती दिसते. कदाचित अशी रूपे वर्तमानपत्रांच्या संपादकांना अपमानदर्शक वाटत असावीत. अनेकदा 'ठाकरेंनी' असे चुकीचे प्रयोगही केले जातात.

(२) खाली काही सर्वनामांच्या तौलनिक वारंवारता दिल्या आहेत.

| शब्द | वर्तमानपत्रे | भागवत | विश्वकोश | विकीपीडिया | लेक्झेटेरिया |
|---|---|---|---|---|---|
| हा | १ | २० | ५ | ८ | १३ |
| हे | १९ | ७ | २० | ४ | ९ |
| ही | २७ | १९ | ३६ | १० | २५ |

वर्तमानपत्रे आणि विश्वकोश यामध्ये ''हा'' शब्द वापरण्याची प्रवृत्ती जास्त दिसते तर ''हे'' हा शब्द बाकीच्या संग्रहात वरच्या क्रमांकावर येतो. सर्वसाधारणपणे ''ही''

या शब्दाची वारंवारता ''हा'' व ''हे'' पेक्षा फारच कमी दिसते. ''हा'' ''ही'' नि ''हे'' या शब्दावरून संबंधित नामाचे लिंग आणि वचन बाबत अंदाज लावता येईल. पुल्लिंगी नामांचे प्रमाण जास्त वाटते. प्रत्यक्ष नामे आणि त्यांच्या वारंवारता काढल्यावर हा तर्क तपासून पाहता येईल.

**(४) जास्त वारंवारता असलेले मूळ-शब्द**

ह्या भागात जास्त वेळा वापरात येणारे मूळ-शब्द आणि यांच्या वारंवारता दिल्या आहेत. यासाठी लेक्झेटेरियाचा संग्रह सोडून उरलेले चार संग्रह एकत्र केले आहेत. प्रथम, मराठी मजकुरात आलेल्या शब्दाचा मूळ शब्द शोधण्याचे तंत्र ('मूळ-शब्दशोधक' स्टमर) विकसित केले. त्यानंतर, तक्ता क्रमांक १ ज्या मोठ्या यादीवरून तयार केला, त्या यादीतले, वारंवारतेनुसार पहिले १,५०० शब्द घेतले (हे करताना लेक्झेटेरियाच्या संग्रहाचा समावेश केलेला नाही.) त्यातल्या प्रत्येक शब्दाला मूळ-शब्दशोधक लावून, अशा शब्दांची यादी तयार केली. मूळ-शब्दाच्या सगळ्या रूपांची बेरीज म्हणजे त्या शब्दाची वारंवारता होय. या यादीत गणितातील किंवा विज्ञानातील विशेष चिन्हे, संख्या, संक्षिप्त रूपे यांचाही समावेश आहे.

(टीप : चार संग्रहांत आलेल्या विभिन्न शब्दांची एकूण संख्या ३,१८,४४२ आहे. हे शब्द मूळ-शब्द नाहीत; ते जसे दिसले तसे असून तक्ता क्रमांक १ अशा शब्दांपासून तयार झाला आहे. लेक्झेटेरिया-संग्रह सोडून उरलेल्या चार संग्रहांत एकूण सुमारे पन्नास लाख शब्द आहेत. (वारंवारतेची बेरीज केल्यास एकूण शब्द संख्या सुमारे ४९ लाख आहे आणि त्यात ३,१८,४४२ वेगवेगळे शब्द आहेत.) वर वर्णन केलेले १,५०० मूळ-शब्द अशा एकूण पन्नास लाख शब्दांपैकी ६० टक्के म्हणजे सुमारे तीस लाख शब्दांची मूळ रूपे आहेत. सर्व शब्द घेतले तरी तक्ता क्रमांक २ मधील शब्द आणि त्यांची क्रमवारी यात फारसा फरक पडणार नाही. कारण उरलेले शब्द हे तुलनेने याहूनही कमी प्रमाणात आढळतील.)

या यादीची एक मर्यादा म्हणजे एखाद्या शब्दाचे मूळ रूप कोणते हे केवळ त्या शब्दाचा विचार करून सांगता येत नाही. उदाहरणार्थ 'जात' हा शब्द बघा. हा ''जाणे'' या क्रियापदाचे रूप आहे का 'जात' या नामाचे रूप आहे हे संदर्भाशिवाय सांगता येणार नाही. म्हणून ''जात'' हा शब्द ''जाणे/जात'' असा दर्शवला आहे; तर, ''जाणे''ची अन्य रूपे ''जाणे''च्या वारंवारतेत समाविष्ट केली आहेत.

वारंवारतेच्या क्रमवारीनुसार येणारे पहिले २०० मूळ-शब्द तक्ता क्रमांक २ मध्ये दिले आहेत.

**तक्ता क्रमांक २ - मराठीत वारंवारतेनुसार येणारे पहिले २०० मूळ-शब्द**

| १- ५० | ५१-१०० | १०१-१५० | १५१-२०० |
|---|---|---|---|
| करणे | म्हणजे | शकणे | कोणत्या |
| यांना | नवा | प्रकार | केंद्र |
| होणे | तिचा | जर | शतक |
| येणे | न | सरकार | लक्ष |
| आहे | दिसणे | पुणे | किमी |
| त्यात | पाच | काढणे | स्थान |
| असणे | माहिती | काम | मराठी |
| आणि | म्हणणे | इतर | किती |
| हा | डॉ | उपयोग | पद्धत |
| व | जास्त | ठिकाण | च्या |
| असा | तरी | मी | उपलब्ध |
| नाही | हा | तेथे | दरम्यान |
| या | वापरणे | नागपूर | वाढणे |
| देणे | जो | सु | देणे |
| त्यांना | तसा | पूर्ण | साल |
| येथे | जिल्हा | दिवस | बाहेर |
| ते | स्पष्ट | प्रमाण | ठेवणे |
| तर | केवळ | उत्तर | कोटी |
| हे | सांगणे | सुमारे | का |
| जाणे | काळ | भाग | तेव्हा |
| सुरू | चार | श्री | खंड |
| घेणे | पहिला | बंद | परिस्थिती |
| त्याचा | नाही | कारण | भर |
| एक | किंवा | अपेक्षा | नाव |





अनुक्रमणिका

| १- ५० | ५१-१०० |
|---|---|
| मात्र | आढळणे |
| त्यांचा | अधिक |
| आज | प्रत्येक |
| दोन | इ |
| काही | विशेष |
| या | हजार |
| जाणे/जात | प्रयत्न |
| की | परंतु |
| प्रमुख | पुढील |
| लागणे | सर्व |
| अनेक | मध्ये |
| पान | पडणे |
| त्या | मुंबई |
| आपला | भारतीय |
| कमी | आता |
| असा | अधिकारी |
| मोठा | वर्ष |
| विविध | दुसरा |
| तो | काय |
| मिळणे | निर्माण |
| ती | दोन |
| म्हणून | तयार |
| राज्य | पुन्हा |
| पण | राहणे |
| वेळ | नसणे |
| तीन | भाग |

| १०१-१५० | १५१-२०० |
|---|---|
| समावेश | आपण |
| सुरवात | प्रमाण |
| विचार | वेगवेगळा |
| सहा | उंच |
| प्रदेश | लांब |
| भारत | वा |
| देश | कधी |
| दक्षिण | नये |
| बरेच | भूमिका |
| महत्त्व | मुख्य |
| संख्या | उदाहरण |
| नव्हे | आ |
| चर्चा | बहुतेक |
| परिणाम | होय |
| विद्युत | निर्णय |
| नंतर | कॉन्ग्रेस |
| लाख | पोलिस |
| अर्थ | पदार्थ |
| अन्य | दूर |
| स्वरूप | प्रसिद्ध |
| सध्या | अध्यक्ष |
| प्रकार | आणखी |
| राजकीय | आवश्यक |
| आर्थिक | शक्य |
| शिक्षण | दृष्टी |
| विकास | व्यक्त |

काही चिन्हे विकिपीडियात अनेकदा येतात, उदाहरणार्थ ''आ''(आकृती), ''सु''(सुमारे). त्यांचा अन्यत्र वापर कमी असला, तरी विकिपीडियात त्यांची वारंवारता खूप असल्याने त्यांचा समावेश पहिल्या २०० शब्दांत झाला आहे. ''च्या'' हे अक्षर संदर्भानुसार आकड्यानंतर येते. (जसे की ''२०१३च्या''), म्हणून या यादीत आले आहे.

आपल्या आवश्यकतेनुसार असे शब्द किंवा चिन्हे वगळून आपण ह्या याद्यांचा वापर करू शकतो.

काही शब्द वेगवेगळ्या प्रकारे लिहिले जातात, ते दोन्ही याद्यांत एकाच शब्दाने दाखवले आहेत. (उदाहरणार्थ - तेव्हा/तेव्हां, करण्याकरता/करण्याकरिता)

तक्ता क्रमांक २ मधे, एखाद्या क्रियापदाच्या वारंवारतेमधे त्याच्या सर्व रूपांची वारंवारता समाविष्ट आहे. उदाहरणार्थ, ''करणे'' ह्या क्रियापदाच्या खालील रूपांची वारंवारता त्याच्या वारंवारतेमधे समाविष्ट आहे.

करणे - केल्यास, केल्याने, केल्यानंतर, केल्या, केलेल्या, केलेले, केलेली, केलेला, केले, केली, केला, करून, करू, करीत, करावे, करावी, करावा, करतो, करते, करताना, करतात, करता, करत, करण्यासाठी, करण्यास, करण्यात, करण्याच्या, करण्याचे, करण्याची, करण्याचा, करण्याकरता, करणे, करणाऱ्या, करणारे, करणारी, करणारा, करणार.

तक्ता क्रमांक १ मधे दिल्याप्रमाणे, या रूपांपैकी 'केली', 'केले', 'करण्यात', 'करून' ह्या रूपांची वारंवारता जास्त आहे.

काही विशेष क्रियापदांच्या बाबतीत, त्यांची वारंवारता म्हणजे त्यांच्या समोर दिलेल्या शब्दांची एकत्रित वारंवारता आहे.

**असणे** - असेल, असून, असू, असावेत, असावे, असावी, असावा, असल्यास, असल्यामुळे, असल्याने, असल्याचे, असल्याची, असल्याचा, असलेल्या, असलेले, असलेली, असलेला, असले, असली, असला, असतो, असते, असतील, असताना, असतात, असता, असत, असणे, असणाऱ्या, असणारे, असणारी, असणार.

**नव्हे** - नव्हे, नव्हते, नव्हती, नव्हता.

**आहे** - आहे, आहोत, आहेत.

**नसणे** - नसून, नसल्यामुळे, नसल्याने, नसल्याचे, नसतो, नसते, नसतात.

**नाही** - नाहीत, नाही.

नामांच्या आणि विशेषणांच्या बाबतीत, त्यांचे वचन (एक/अनेक), लिंग आणि विभक्ती यांपासून मिळणारी सर्व रूपे एकत्रित करून त्यांच्या वारंवारता तयार केल्या आहेत.

तक्ता क्रमांक १ आणि २ यांच्यावर आधारित काही निरीक्षणे पुढे नोंदवली आहेत.

(१) करणे, देणे, असणे, आहे*, येणे, जाणे अशा क्रियापदांच्या विविध रूपांचा पहिल्या दोनशे शब्दांत समावेश आहे. विशेष म्हणजे या क्रियापदांची अनेक रूपे (भूतकाळ, भविष्यकाळ इत्यादी) ही सर्वसाधारण नियमांना अपवाद आहेत. या क्रियापदांना समांतर असलेली इंग्रजी आणि संस्कृत क्रियापदे सुद्धा अपवाद-क्रियापदेच आहेत. प्रमाण-भाषेचे नियम प्रस्थापित होण्याआधी ह्या क्रियापदांची विविध रूपे 'प्रस्थापित' झाली असावीत, असा तर्क यावरून आपण करावा काय?

(२) मराठीत जास्त वारंवारतेने वापरले जाणारे फारसी/अरबी/ऊर्दू इत्यादी शब्द पुढे दिले आहेत. ही यादी करताना मराठीतल्या पहिल्या तीनशे शब्दांचा विचार केला आहे.

व, तारीख, हजार, कमी, जरा, जास्त, माहीत, दाखल, तयार, जिल्हा (जिल्ह्यात, जिल्ह्यातील...) एकदम, सुमारे, माजी, बंद, दरम्यान, शहर(शहरात...), जाहीर, सरकार(सरकारी...), गर्दी, खूप, गरज, सुरू, सुरवात.

मराठी शब्दसंकुलावर फारसी इ० भाषांचा मोठा प्रभाव पडलेला दिसतो. वरीलपैकी काही शब्दांना शासकीय पारिभाषिक शब्दकोशात संस्कृताधारीत मराठी शब्दांचा पर्याय दिला आहे, त्याचा लोकांवर फारसा परिणाम झालेला दिसून येत नाही. उदाहरणार्थ, सरकार/सरकारी ह्या शब्दांची वारंवारता शासन/शासकीय ह्या शब्दांच्या वारंवारतेपेक्षा जास्त आहे.

(३) वर उल्लेखिल्याप्रमाणे, ह्या यादीत करणे, देणे, घेणे, येणे, जाणे, असणे आणि 'आहे*' ही क्रियापदे आणि त्यांची विविध रूपे यांचा वाटा मोठा आहे. संस्कृत किंवा इंग्रजी या भाषांमधील क्रियापदांचा अर्थ मराठीतून व्यक्त होताना 'करणे', वर दिलेली क्रियापदे, शिवाय 'लागणे', 'पडणे', 'लावणे' अशा क्रियापदांचा वापर मराठीत जवळजवळ अपरिहार्य आहे. उदाहरणार्थ, थिंक, ट्रॅवल, बिगिन, स्टडी ही क्रियापदे बघा. यासाठी 'करणे' हे क्रियापद वापरावे लागते. ''करणे''सारख्या अशा क्रियापदांना अतिभार क्रियापदे (हेवी ड्यूटी) असे संबोधण्यात आले आहे. [बडवे(१९८८)]. बडव्यांनी मराठीत ह्या क्रियापदांचा असा वापर मोठ्या प्रमाणावर होतो हे नोंदवले आहे. विशेष म्हणजे त्यांनी प्रमुख युरोपीय भाषांमधील सगळ्यात जास्त वेळा वापरल्या जाणाऱ्या शब्दांमधील पहिले १००० शब्द घेऊन हे निरीक्षण नोंदवले आहे. मराठी विद्यार्थ्यांना अशा भाषा शिकवण्याच्या संदर्भात त्यांनी या वैशिष्ट्यांची चर्चा केली आहे. रशियन भाषेतसुद्धा असे प्रयोग मोठ्या प्रमाणावर होतात, असे त्यांनी नमूद केले आहे.

उदाहरणार्थ, www.englishclub.com ह्या संकेतस्थळावरून घेतलेली, इंग्रजीत सर्वात जास्त वापरली जाणारी पहिली २५ क्रियापदे बघा :





अनुक्रमणिका

बी, हॅव, डु, से, गेट, मेक, गो, नो (know), टेक, सी, कम, थिंक, लुक, वॉन्ट, गिव, यूज, फाइंड, टेल, आस्क, वर्क, सीम, फील, ट्राय, लीव, कॉल.

(यांतील पहिल्या १२ क्रियापदांची काही रूपे नेहमीच्या नियमांना अपवाद आहेत. या क्रियापदांसाठी जी क्रियापदे मराठीत वापरली जातात, तीसुद्धा क्रियापदाची विविध रूपे करण्याच्या नियमांना अपवाद आहेत!) या २५ क्रियापदांपैकी, कमीत कमी पाच-सहा क्रियापदांचे मराठीत भाषांतर करताना एक क्रियापद आणि एक नाम असा 'संयुक्त' प्रयोग करावा लागतो. अशी 'द्विपदी' क्रियापदे वापरण्याची मराठीची ही प्रवृत्ती फारसीच्या प्रभावामुळे निर्माण झाली आहे. फारसीशी संबंध येण्यापूर्वीचे मराठी कमी प्रमाणात उपलब्ध असले तरी 'ज्ञानेश्वरी'त एकपदी क्रियापदांचा वापर सढळ आहे, हे 'ज्ञानेश्वरी'च्या अभ्यासकांना विदितच आहे.

(४) तक्ता क्रमांक १ आणि २ या दोन्हींमधे क्रियापदे, सर्वनामे, संख्यावाचक आणि इतर विशेषणे, वाक्ययोगी/ शब्दयोगी शब्द (''आणि'', ''व'', ''म्हणजे'', ''म्हणून'' इत्यादी) आणि क्रियाविशषणे यांचे स्वाभाविकपणे प्राबल्य आहे. सर्वात जास्त येणारे नाम ''माहिती'' असून ते ''माहीयत'' या अरबी विशेषणापासून तयार झाले आहे! जास्त वारंवारतेने येणारी काही नामे पुढीलप्रमाणे - पान, राज्य, पोलीस, जिल्हा, मुंबई, अधिकारी, तारीख, वर्ष, साल, अपेक्षा, विद्युत, काळ, वेळ, प्रयत्न, राज्य, नागपूर, प्रदेश, भाग, परिस्थिती, भूमिका, आदेश, अध्यक्ष, निर्णय, शेतकरी, ठिकाण, कार्यक्रम, चर्चा, शतक, पदार्थ, काम, शिक्षण, विकास. चार संग्रहांच्या एकंदर स्वरूपामुळे या नामांची वारंवारता जास्त आहे.

**(५) जास्त वेळा येणारी अक्षरे**

वर उल्लेख केलेल्या शब्द-संग्रहांचा वापर करून लेखी प्रमाण-मराठीत कोणती अक्षरे जास्त वेळेला येतात, याची आकडेवारी आम्ही तयार केली. भागवतांनीसुद्धा त्यांच्या पुस्तकात अक्षरांच्या वारंवारता दिल्या आहेत. या आधी नमूद केल्याप्रमाणे, त्यांचा उद्देश मराठीसाठी लघु-लेखन-प्रणाली निर्माण करणे हा होता.

ह्या संग्रहात सुमारे ३,००० वेगळी अक्षर-चिन्हे आढळली. (त्यातली बरीचशी, इंग्रजी शब्द देवनागरी मराठीत लिहिल्यामुळे तयार झाली आहेत. काही चिन्हे चुकीच्या लेखनामुळे आलेली दिसतात. अशी चिन्हे आम्ही वगळली आहेत.)

एकूण वारंवारतेच्या ८० टक्के वारंवारता पुरी होईल एव्हढी (१२०) अक्षरे तक्ता क्रमांक ३ मधे दिली आहेत. त्यावरून पहिली काही अक्षरे वगळता, बरीचशी अक्षरे 'दुर्मीळ' आहेत, हे लक्षात येते. पहिल्या ११ अक्षरांनी २५ टक्के वारंवारता, तर पहिल्या ३७ अक्षरांनी ५० टक्के वारंवारता सिद्ध होते! हे झिप्फच्या सिद्धांताला सर्वसाधारणपणे धरून आहे. यादीत न दिलेली अक्षरे याहूनही आणखी 'दुर्मीळ' असणार, हे उघड आहे.

## तक्ता क्रमांक ३ - अक्षरांच्या वारंवारता

| अक्षर | वारंवारता | टक्केवारी | संचयी टक्केवारी |
|---|---|---|---|
| त | 424590 | 0.0379 | 0.0379 |
| न | 287438 | 0.0257 | 0.1268 |
| अ | 221631 | 0.0198 | 0.1901 |
| ले | 173960 | 0.0155 | 0.2402 |
| ना | 157393 | 0.0141 | 0.2837 |
| ला | 129185 | 0.0115 | 0.3194 |
| रा | 106404 | 0.0095 | 0.3497 |
| वि | 103562 | 0.0092 | 0.3776 |
| र | 396121 | 0.0354 | 0.0733 |
| आ | 264869 | 0.0237 | 0.1505 |
| स | 204357 | 0.0183 | 0.2083 |
| प | 167335 | 0.0149 | 0.2551 |
| च्या | 135639 | 0.0121 | 0.2958 |
| ली | 123969 | 0.0111 | 0.3304 |
| मा | 105055 | 0.0094 | 0.3591 |
| यां | 102614 | 0.0092 | 0.3868 |
| क | 312081 | 0.0279 | 0.1012 |
| व | 221819 | 0.0198 | 0.1703 |
| ल | 182489 | 0.0163 | 0.2246 |
| का | 162926 | 0.0146 | 0.2697 |
| म | 134225 | 0.0120 | 0.3078 |
| ती | 109406 | 0.0098 | 0.3402 |
| सा | 104078 | 0.0093 | 0.3684 |
| त्या | 101009 | 0.0090 | 0.3958 |

| अक्षर | वारंवारता | टक्केवारी | संचयी टक्केवारी |
|---|---|---|---|
| ही | 97863 | 0.0087 | 0.4046 |
| ग | 94527 | 0.0084 | 0.4300 |
| य | 91615 | 0.0082 | 0.4547 |
| हे | 88614 | 0.0079 | 0.4786 |
| ते | 87359 | 0.0078 | 0.5021 |
| च | 78211 | 0.0070 | 0.5239 |
| ने | 77461 | 0.0069 | 0.5447 |
| ण्या | 69366 | 0.0062 | 0.5643 |
| ये | 63235 | 0.0056 | 0.5819 |
| री | 61484 | 0.0055 | 0.5986 |
| णा | 57133 | 0.0051 | 0.6143 |
| ट | 55194 | 0.0049 | 0.6293 |
| ह | 53353 | 0.0048 | 0.6439 |
| सं | 52218 | 0.0047 | 0.6579 |
| ए | 47252 | 0.0042 | 0.6714 |
| दि | 43391 | 0.0039 | 0.6831 |
| ख | 39557 | 0.0035 | 0.6938 |
| वे | 37166 | 0.0033 | 0.7039 |
| ध | 34447 | 0.0031 | 0.7132 |
| रि | 32197 | 0.0029 | 0.7220 |
| की | 30661 | 0.0027 | 0.7304 |
| णे | 29152 | 0.0026 | 0.7384 |
| बा | 27406 | 0.0024 | 0.7459 |
| से | 25958 | 0.0023 | 0.7530 |

| अक्षर | वारंवारता | टक्केवारी | संचयी टक्केवारी | अक्षर | वारंवारता | टक्केवारी | संचयी टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| के | 95520 | 0.0085 | 0.4131 | ता | 95233 | 0.0085 | 0.4216 |
| या | 92113 | 0.0082 | 0.4383 | वा | 92092 | 0.0082 | 0.4465 |
| चा | 90262 | 0.0081 | 0.4627 | ज | 89448 | 0.0080 | 0.4707 |
| नी | 87727 | 0.0078 | 0.4865 | प्र | 87658 | 0.0078 | 0.4943 |
| मु | 85314 | 0.0076 | 0.5097 | हा | 80881 | 0.0072 | 0.5170 |
| चे | 77871 | 0.0070 | 0.5309 | ण | 77465 | 0.0069 | 0.5378 |
| पा | 75376 | 0.0067 | 0.5515 | ल्या | 74070 | 0.0066 | 0.5581 |
| ची | 68389 | 0.0061 | 0.5704 | द | 65697 | 0.0059 | 0.5762 |
| ड | 63074 | 0.0056 | 0.5875 | ळे | 62466 | 0.0056 | 0.5931 |
| ब | 61053 | 0.0055 | 0.6040 | उ | 57266 | 0.0051 | 0.6092 |
| रू | 56929 | 0.0051 | 0.6193 | जा | 56364 | 0.0050 | 0.6244 |
| त्यां | 54968 | 0.0049 | 0.6342 | हो | 54455 | 0.0049 | 0.6391 |
| नि | 53010 | 0.0047 | 0.6486 | श | 52347 | 0.0047 | 0.6533 |
| ळ | 51898 | 0.0046 | 0.6626 | णि | 51319 | 0.0046 | 0.6671 |
| झा | 44296 | 0.0040 | 0.6753 | सु | 43948 | 0.0039 | 0.6792 |
| भा | 40435 | 0.0036 | 0.6867 | शा | 39995 | 0.0036 | 0.6903 |
| दा | 37910 | 0.0034 | 0.6972 | दे | 37639 | 0.0034 | 0.7006 |
| त्र | 35333 | 0.0032 | 0.7071 | शी | 34739 | 0.0031 | 0.7102 |
| ठी | 33303 | 0.0030 | 0.7162 | इ | 32386 | 0.0029 | 0.7191 |
| गा | 32091 | 0.0029 | 0.7248 | सू | 31497 | 0.0028 | 0.7277 |
| रे | 30517 | 0.0027 | 0.7331 | मि | 30184 | 0.0027 | 0.7358 |
| ति | 28528 | 0.0025 | 0.7410 | हि | 27775 | 0.0025 | 0.7434 |
| तो | 27094 | 0.0024 | 0.7483 | मी | 25976 | 0.0023 | 0.7506 |
| शि | 25194 | 0.0023 | 0.7552 | पु | 24242 | 0.0022 | 0.7574 |

| अक्षर | वारंवारता | टक्केवारी | संचयी टक्केवारी |
|---|---|---|---|
| घे | 24105 | 0.0022 | 0.7595 |
| को | 22702 | 0.0020 | 0.7657 |
| दो | 20783 | 0.0019 | 0.7713 |
| ध्ये | 20313 | 0.0018 | 0.7768 |
| ष | 19539 | 0.0017 | 0.7821 |
| घ | 19127 | 0.0017 | 0.7873 |
| णी | 18860 | 0.0017 | 0.7924 |
| खा | 18296 | 0.0016 | 0.7973 |
| क्ष | 23299 | 0.0021 | 0.7616 |
| थी | 21813 | 0.0019 | 0.7676 |
| ज्या | 20530 | 0.0018 | 0.7732 |
| ळा | 19906 | 0.0018 | 0.7786 |

| अक्षर | वारंवारता | टक्केवारी | संचयी टक्केवारी |
|---|---|---|---|
| गे | 19354 | 0.0017 | 0.7839 |
| ऊ | 19075 | 0.0017 | 0.7890 |
| ढ | 18421 | 0.0016 | 0.7940 |
| मो | 17824 | 0.0016 | 0.7989 |
| ई | 22880 | 0.0020 | 0.7636 |
| रो | 20970 | 0.0019 | 0.7695 |
| पू | 20529 | 0.0018 | 0.7750 |
| म्ह | 19879 | 0.0018 | 0.7804 |
| धा | 19159 | 0.0017 | 0.7856 |
| लि | 18998 | 0.0017 | 0.7907 |
| वी | 18392 | 0.0016 | 0.7956 |
| ळी | 16961 | 0.0015 | 0.8004 |

काही निरीक्षणे :

( १ ) 'त' हे अक्षर सर्वात जास्त वेळा येते हे स्वाभाविक आहे. सर्वच क्रियापदांच्या अपूर्ण वर्तमानकाळाच्या रूपात 'त' येतो. त्यापैकी घेत, देत, करत, करण्यात, आहेत, नाहीत अशी बहुपयोगी आणि वारंवार येणारी क्रियापदे पहिल्या तक्त्यात आलीच आहेत आणि त्यांच्या वारंवारता इतर शब्दांपेक्षा जास्त आहेत.

( २ ) 'आहे', 'आणि', 'आहेत', 'आपल्या' आणि 'येणे' या क्रियापदाची विविध रूपे अशा शब्दांमुळे 'आ' ह्या अक्षराचा क्रम वरचा आहे. 'आ'ची वारंवारता हा संस्कृतचा वारसा आहे.

( ३ ) 'तर', 'भारतीय', 'इतर', 'चार', 'विचार' अशा शब्दांमुळे 'र'चा क्रम वरचा आहे; पण 'करणे'ची अनेक रूपे शब्दांच्या यादीत पहिल्या दोनशेत आहेत. 'र'चा क्रम दुसरा येण्याचे हेही महत्त्वाचे कारण आहे. शिवाय, करणार, देणार अशा भविष्यकाळाच्या रूपांतही 'र'चा वापर होतो. काहीशी आश्चर्याची गोष्ट म्हणजे मराठीत फारसी इ० भाषांतील जे शब्द जास्त वेळा वापरले जातात (ज्यांची यादी आम्ही वर दिली आहे), त्यांच्यातही 'र'चा जोर आहे!

( ४ ) 'त', 'र', 'न' अशा अक्षरांची मोठी वारंवारता हा कदाचित संस्कृतचा वारसा आहे. 'र'चे प्राबल्य ऋग्वेदकालीन संस्कृतपासून असण्याची शक्यता आहे.

( ५ ) 'करून', 'असून' ही रूपे पहिल्या दोनशे शब्दांत आहेत. अशी इतर क्रियापदांची रूपे आणि क्रमवारीत तुलनेने खाली असलेल्या अन्य शब्दांमधून 'न'ची एकूण वारंवारता वाढलेली आहे.

( ६ ) 'व' 'त्या' ही अक्षरे एक शब्द म्हणूनही वापरली जातात. एक शब्द म्हणून 'व'ची क्रमवारी मुळातच वरची आहे.

( ७ ) एकंदरीत, अक्षरांच्या वारंवारतेत तालव्य गट प्रबळ आहे.

आ हा स्वर, तालव्य गटाचे आणि 'र'चे प्राबल्य याबाबतीत मराठीचे संस्कृतशी निकटचे नाते दिसते.

संस्कृतच्या अशा वारंवारतांचा अभ्यासासाठी व्हिटनेचे संस्कृत व्याकरणावरचे पुस्तक (परिच्छेद ७५) पाहावे. [व्हिटने(१८८८)].

शब्द आणि अक्षरे यांचा एकंदरीत विचार करता, या वारंवारतांत, क्रियापदे (विशेषतः वर उल्लेखिलेली 'करणे' इत्यादी क्रियापदे) आणि त्यांची विविध रूपे यांचा वाटा फार मोठा आहे.

काही उपयोग :

(१) खाली दिलेल्या जोडाक्षरांच्या वापराची शेकडेवारी बघा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| च्या | त्या | प्र | ल्या | त्यां |
| 0.01211 | 0.00902 | 0.00783 | 0.00662 | 0.00491 |
| त्र | क्ष | ज्या | ध्ये | म्ह |
| 0.00316 | 0.00208 | 0.00183 | 0.00181 | 0.00178 |

एकूण ८०%अक्षरांमधील ५% अक्षरे ही जोडाक्षरे आहेत. पण बहुतांश मराठी कळफलक तयार करताना अशा गोष्टींकडे दुर्लक्ष केलेले दिसते. फक्त 't' हे चिन्ह टंकलिखित केल्यावर काही लेखन-व्यवस्थांमध्ये 'त' मिळत नाही, तर पायमोडका 'त' मिळतो. म्हणजे 'तो', 'त्या' अशी चिन्हे असण्याची शक्यता आहे म्हणून 'त'ची वारंवारता जास्त असून त्यासाठी सुटसुटीत चिन्ह ठेवण्याऐवजी इतर कमी वारंवारता असलेल्या चिन्हांच्या सोयीसाठी तसे केले जात नाही.

वर दिलेली जोडाक्षरे आणि 'आणि' 'आहे' ह्या शब्दांचे, युनिकोड किंवा देवनागरीच्या अन्य संगणकीय लेखन-व्यवस्थेत टंकलेखन करायला वेळ तर





अनुक्रमणिका

लागतोच शिवाय त्यात चुका होण्याचीही शक्यता असते. कळफलक तयार करताना शब्द आणि अक्षरे यांची सांगड घातली तर अधिक चांगले. लाटेक्स (Latex) सारख्या, गणित आणि विज्ञान यांच्या पुस्तकांसाठी अत्यंत उपयोगी असलेल्या टंकलेखन पद्धतीत गणितातल्या चिन्हांसाठी अनेक सोयी केलेल्या असतात. अशा शब्दांसाठी किंवा जोडाक्षरांसाठी आपण अशा सोयी वापरून आपण मराठी-देवनागरी टंकलेखन सुलभ आणि जलद करू शकू.

इंग्रजीसाठी श्राव्य रूपाचे लिखितात (speech-to-text) रूपांतर करण्याची सोय उपलब्ध आहे. मराठीसाठी अशी संगणक-व्यवस्था तयार करताना ह्या वारंवारतांचा उपयोग होईल. उदाहरणार्थ, 'आ'ने सुरू होणारा शब्द कोणता आहे, हे संगणकास न समजल्यास, 'आ'ने सुरू होणाऱ्या शब्दांची यादी वारंवारतेच्या क्रमाने देता येईल. आपण त्यातून योग्य तो पर्याय निवडू शकतो. एखाद्या मजकुरातील शुद्धलेखनाच्या चुका काढून योग्य शब्दांचे पर्याय देताना या वारंवारतांचा वापर केला जातो.

( २ ) मराठीसाठी देवनागरीचे लेखन शिकवताना कोणती अक्षरे आधी शिकवावीत ह्या दृष्टीने ह्या यादीचा उपयोग होऊ शकतो. अर्थात अशी अक्षरे ज्या शब्दांत येतात ते शब्द प्रारंभी शिकवावेत. उदाहरणार्थ, 'परत', 'आत', 'गवत', 'मासा', 'आले' यांसारखे शब्द सुरुवातीला शिकवले तर ते जास्त सोयीचे होईल.

( ३ ) वेगवेगळ्या पातळ्यांसाठी असलेले शब्दकोश शब्दांच्या वारंवारतेवर अवलंबून असतात. दुर्मीळ शब्दांचे अर्थ शोधण्यासाठी आपल्याला मोठाले शब्दकोश बघावे लागतात. अंधांसाठी किंवा मतिमंदांसाठीच्या लेखन अथवा शिक्षण-सामग्री तयार करतानाही वारंवारतेचे तत्त्व कळत-नकळत पाळले जाते.

( ४ ) एखाद्या गुप्त लिपीत लिहिलेला मराठी मजकूर वाचताना अशा वारंवारतांचा वापर करता येतो. एड्गर ॲलन पोच्या 'गोल्डन बग' ह्या कादंबरीतील नायक रोमन अक्षरांच्या वारंवारतांच्या साहाय्याने खजिना कोठे लपवून ठेवला आहे, हे शोधून काढतो! अर्थात मजकूर पाठविणाऱ्यास जर असा शोध घेतला जाणार असल्याची कल्पना असेल तर तो त्या दृष्टीने अनेक बदल करेलच. असे मजकूर वाचायला अधिकाधिक अवघड करण्याच्या पद्धती निर्माण करणे आणि तो वाचण्यात कमीत कमी चुका करणे या दोन्हींमधून आधुनिक क्रिप्टोलॉजी (Cryptology)चा उगम झाला आहे.

ह्या अभ्यासाची एक मर्यादा म्हणजे तो प्रमाण-भाषेत लिहिलेल्या आणि ई-स्वरूपात (आणि तेही युनिकोड देवनागरीत!) उपलब्ध असलेल्या मजकुरावर आधारित आहे. बोली मराठीचे स्वरूप काही बाबतीत, वर वर्णिले आहे त्यापेक्षा

बरेच वेगळे असणार हे उघड आहे. उदाहरणार्थ, इंग्रजी शब्दांचा वापर बोलीत निश्चितच जास्त आहे. शिवाय, 'मी तुला 'फोन करतो', मी बँकेतून पैसे 'विड्रॉ करतो' असे प्रयोग तर अनेकदा होतात. तेव्हा 'करणे'चे ओझे (भार) अधिकच वाढला असणार असा प्राथमिक कयास करण्यास हरकत नाही.

बोली मराठीचा मोठा आणि व्यापक संग्रह आज उपलब्ध नाही. काही नाटके आणि चित्रपट, मुलाखती, गाणी आज ई-स्वरूपात उपलब्ध आहेत. इंग्लंडमधले काही प्रकाशक, ऑक्सफर्ड आणि लँकेस्टर विद्यापीठे आणि ब्रिटिश लायब्ररी यांनी एकत्र येऊन ब्रिटिश राष्ट्रीय संग्रह (British National Corpus) तयार केला असून केला असून तो इंटरनेटवर उपलब्ध आहे. त्यात लिखित आणि श्राव्य ह्या दोन्ही स्वरूपांत मिळून १० कोटी शब्द आहेत! हा संग्रह अर्थात ई-स्वरूपात असून वेबवरील उपलब्ध मजकूर, वर्तमानपत्रे, पुस्तके, दूरदर्शन आणि रेडिओवरच्या बातम्या यांचा त्याच्यात समावेश आहे.

अशा श्राव्य मराठी संग्रहाचे संख्याशास्त्रीय विश्लेषण करण्याच्या दिशेने आम्ही काही प्रयत्न करीत आहोत. बोलीतून थेट, म्हणजे लिखित रूप टाळून, अशा वारंवारता मिळवणे शक्य आहे. ते करण्याचा आमचा विचार आहे.

[**आभार** - या लेखाच्या संदर्भात डॉ० प्रदीप आपटयांशी, फारसी, उर्दू आणि अरबी ह्या भाषांच्या बाबतीत उपयुक्त चर्चा झाली. हा लेख लिहिण्यासाठी प्रा०प्र०ना० परांजपे यांनी प्रोत्साहन दिले.]

**संदर्भ :**

बडवे, नीती (१९८८) अ कंपॅरेटिव स्टडी ऑफ हाय फ्रिक्वेन्सी लेक्झिकल आयटेम्स ऑफ जर्मन, फ्रेंच अँड रशियन विथ स्पेशल रेफरन्स टू मराठी स्पीकिंग स्टुडंट्स, इंटरडिसिप्लिनरी मोनोग्राफ सीरिज, ४, पुणे विद्यापीठ, पुणे. (अप्रकाशित)

भागवत, श्री०वा० (१९६१) फोनेमिक फ्रिक्वेन्सीज इन मराठी अँड देअर रिलेशन टू डिवायजिंग अ स्पीड-स्क्रीप्ट (मराठीत वारंवार येणारे शब्द नि ध्वनी आणि त्यांचा जलद लेखनाशी संबंध) डेक्कन कॉलेज, पुणे.

व्हिटने, डब्ल्यू०डी० (१८८८) संस्कृत ग्रामर (पुनर्मुद्रण-१९८३) मोतीलाल बनारसीदास. दिल्ली.

झिप्फ, जी०के० (१९३२) सिलेक्टेड स्टडीज ऑफ द प्रिन्सिपल ऑफ रिलेटिव फ्रिक्वेन्सीज इन लँग्वेजेस, केंब्रिज, हार्वर्ड युनिवर्सिटी प्रेस.

■

# संहिता-संपादन : स्वरूप आणि पथ्ये

- मृदुला प्रभुराम जोशी

सत्त्वशीला सामंत स्मृती-व्याख्यानासाठी आज आपण मला इथं बोलावलं यासाठी मी आपले मन:पूर्वक आभार मानते. आपलं निमंत्रण हा मी माझा बहुमान समजते. कारण सत्त्वशीला ही माझी जीवश्चकंठश्च सखी तर होतीच; पण अनेक वर्षं आम्ही दोघींनी पुस्तकांच्या संपादनाच्या क्षेत्रात जोडीनं कामं केलं होतं, वेळोवेळी ह्या विषयावरचे एकमेकींचे विचार समजून घेतले होते आणि विचारांचं आदानप्रदानही केलेलं होतं. एका दृष्टीनं ती माझा मोठा आधार होती. काहीही अडचण आली की पटकन फोन उचलायचा, सत्त्वशीलाला आपली शंका विचारायची आणि तिनं तिचं तत्काळ निरसन करायचं हा आमचा नेहमीचा परिपाठ होता. आता तिच्या नसण्यामुळे मला निराधार वाटतं ते एवढ्यासाठीच. आज तिला ह्या निमित्तानं श्रद्धांजली वाहण्याची संधी आपण मला देऊ केली याबद्दल मी आपली कृतज्ञ आहे.

आपण मला 'संहिता-संपादन : स्वरूप आणि पथ्ये' या विषयावर बोलायला सांगितलं आहे. या विषयाचे वेगवेगळे पैलू आहेत हे आपल्यासारख्या जाणकार, अभ्यासू, चिकित्सक श्रोत्यांना सांगायला नकोच. एखादा वाचक पुस्तकावर धावती नजर टाकतो तेव्हा तो जर विचक्षण वाचक असेल तर त्याच्या लगेच लक्षात येतं की ह्या पुस्तकाचं सर्वांगीण संपादन झालं आहे की नाही - मुखपृष्ठापासून ते मलपृष्ठापर्यंत पुस्तकाची मांडणी कशी आहे, पुस्तकाच्या वाचकाला आकर्षित करून घेण्यासाठी काही खास प्रयत्न केलेले आहेत का, मजकूर सुलभतेनं वाचता यावा असा टाइप निवडलेला आहे का, चित्रं, आकृत्या सुस्पष्ट आणि आकर्षक आहेत का अशा अनेक अंगांनी वाचक विचार करू शकतो आणि प्रथमदर्शनी मत बनवू शकतो आणि जर या सर्व प्रश्नांची उत्तरं समाधानकारक असतील तर तो उत्साहानं मजुकराच्या वाचनाकडे वळतो. थोडक्यात, पुस्तकाच्या निर्मितीत त्याच्या अंतरंगाइतकंच बहिरंगही महत्त्वाचं असतं आणि त्यासाठी लेखकाइतकाच संपादकही जबाबदार असतो. पण आज आपल्याला पुस्तकाच्या अंतरंगाविषयीच चर्चा करायची आहे, कारण अंतरंगाचा संबंध संहितेशी आणि तिच्या संपादनाशी असतो.

'संहिता' म्हणजे काय? 'संपादन' म्हणजे काय? आणि 'संहितेचं संपादन' म्हणजे काय? अशा निरनिराळ्या प्रश्नांची उत्तरं यात शोधावी लागतील. आपण प्रामुख्यानं मराठी पुस्तकांविषयी बोलतो आहोत.

मी मराठी पुस्तकांच्या संपादनक्षेत्रात सुमारे पंचेचाळिसांहून जास्त वर्षं काम करत





अनुक्रमणिका

आहे. ह्या माझा दीर्घ अनुभव प्रामुख्यानं पॉप्युलर प्रकाशनात काम केल्यामुळे मिळालेला आहे. तिथेही मुख्यत: रामदास भटकळ यांच्याबरोबर आणि त्यांच्या मार्गदर्शनाखाली काम करताना तो प्राप्त झालेला आहे. त्यामुळे ह्या दीर्घ अनुभवाचं सार असावं असं एक पुस्तक आम्ही दोघांनी मिळून लिहिलेलं आहे. त्याचं नाव आहे. 'प्रकाशनाचे रीतिपुस्तक', म्हणजेच इंग्रजीत ज्याला 'मॅन्युअल ऑफ स्टाईल' म्हणतात ते. सर्वसामान्यपणे इंग्रजी पुस्तकांच्या प्रकाशनगृहांत किंवा वृत्तपत्रांच्या कार्यालयांत अशी रीतिपुस्तके आवर्जून वापरली जातात; परंतु मराठीत निदान अजूनपर्यंत तरी असं सर्वसमावेशक पुस्तक उपलब्ध झालेलं नाही. नुसतं शुद्धलेखन, नुसतं मुद्रितशोधन अशा विषयांवर मराठीत आजवर अनेकांनी पुस्तकं लिहिली आहेत. माझे गुरू यशवंत एकनाथ धायगुडे यांचं 'मुद्रित-शोधन' किंवा मो०रा० वाळंबे यांचं 'मराठी-शुद्धलेखन-प्रदीप', सत्त्वशीला सामंत यांचं 'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली', द०न० गोखले यांचं 'शुद्धलेखनविवेक' तसंच अलीकडच्या काळात खूप उपयुक्त ठरलेला अरुण फडके यांचा 'मराठी लेखन-कोश' आणि 'शुद्धलेखन ठेवा खिशात' यांसारखी सुटसुटीत पुस्तकं ही कुठल्याही संपादकाच्या टेबलावरची आवश्यक गोष्ट ठरलेली आहे. शरद गोगटे, यास्मिन शेख, वसंत दावतर यांनी ह्या यादीत अतिशय मोलाची भर टाकलेली आहे. परंतु तरीही लेखक, संपादक, मुद्रक आणि प्रकाशक ह्या चौघांनाही एकाच वेळी, एकाच पुस्तकातून योग्य असं मार्गदर्शन मिळू शकेल असं पुस्तक अजून उपलब्ध झालेलं नाही. ही उणीव भरून काढण्याचा एक प्रयत्न आम्ही ह्या रीतिपुस्तकाच्या रूपानं करत आहोत.

'संहितेचं संपादन' या विषयाकडे वळण्यापूर्वी आपण स्वत:ला एक प्रश्न विचारला पाहिजे - संहितेचं संपादन करण्याची प्रकाशकांना गरज वाटते का? प्रकाशनगृहात प्रकाशकाव्यतिरिक्त केवळ पुस्तकांचं संपादन करण्यासाठी स्वतंत्रपणे संपादक नेमण्याची आवश्यकता पूर्वी कुणाला जाणवत होती का? आपला असा अनुभव आहे की बहुसंख्य प्रकाशकांकडे संपादक तर नसतोच, पण संपादन म्हणजे काय हेही यांना माहीत नसावं अशा पद्धतीनं पुस्तकं काढली जातात. पूर्वी सर्वसाधारणपणे अनुभव असाच असे की लेखकानं आपण लिहिलेल्या पुस्तकाचं हस्तलिखित प्रकाशकाकडे आणून दिलं की प्रकाशक ते तसंच्या तसं मुद्रकाच्या हाती सोपवत असे आणि मग पुस्तकाचा आकार कसा असावा, त्यासाठी टाइप कोणता वापरावा, मुखपृष्ठासाठी कोणतं चित्र घ्यावं असे निर्णय मुद्रकच घ्यायचा. कित्येक वेळा प्रकाशकानं ती संहिता वाचलेलीही नसायची आणि त्यामुळे कधीकधी अवघड परिस्थितीही निर्माण व्हायची. आज जरी इतकी परिस्थिती नसली तरी सरसकट सगळ्या मराठी प्रकाशकांकडे संपादक नोकरीवर ठेवले जात नाहीत ही वस्तुस्थिती आहे. अजूनही बहुतांश प्रकाशक 'संहितेचं संपादन' करून ते मुद्रकाकडे पाठवत नाहीत. त्याचं एक कारण म्हणजे 'संपादन कसं करावं?' हे शिकवण्याच्या शाळा नाहीत. काम





अनुक्रमणिका

करताकरता अनुभवातून शिकण्याची ती बाब आहे असंच समजलं जातं. मी देखील अशीच शिकले. मौज, पॉप्युलर, राजहंस, मॅजेस्टिक अशांसारख्या काही मोजक्याच प्रकाशनांनी संपादक ह्या व्यक्तीला प्रतिष्ठा देऊन स्वतःचा दर्जा सांभाळलेला आहे.

आता आपण संहिता-संपादनाकडे वळू या.

संहिता-संपादन या शब्दाचे दोन अर्थ आहेत. प्रा० वसंत दावतर यांनी लिहिलेलं 'संहिता समीक्षा आणि पारिभाषिक संज्ञा' हे पुस्तक पाहिल्यावर संहितेचा एक अर्थ लक्षात आला. जुन्या पोथ्या आणि हस्तलिखितं यांची चिकित्सक आवृत्ती तयार करणं म्हणजे 'संहिता-संपादन'. या संपादनात संपादकाला वेगवेगळी कौशल्यं वापरावी लागतात. गूढ लिपी किंवा सांकेतिक लिपी वाचणं आणि तिचा अर्थ लावणं, टिपा लिहिणं, हस्तलिखितावरून कालनिश्चिती करणं वगैरे भाग त्यात येतात. वसंत दावतरांनी ह्या प्रकारच्या संहिता-संपादनाचा फार सूक्ष्म विचार त्यांच्या पुस्तकात केला आहे. यापूर्वी अ०का० प्रियोळकर यांनी ह्या विषयावर विस्तृत लेखन केलं आहे आणि ते 'रघुनाथ पंडित विरचित दमयंतीस्वयंवर' ह्या त्यांच्या ग्रंथात उपलब्ध आहे.

माझ्यापुढे असलेला 'संहिता-संपादन'चा दुसरा अर्थ म्हणजे आपण नेहमी जी पुस्तकं बघतो, वाचतो त्या पुस्तकांच्या संहितेचं संपादन. लेखकानं स्वतःहून आणून दिलेलं किंवा त्याच्याकडून मागवून घेतलेलं, मुद्दाम विषय देऊन लिहवून घेतलेलं असं हस्तलिखित प्रकाशकाकडे येतं आणि प्रकाशक आपल्या ध्येयधोरणात ते बसत असेल तर प्रकाशनासाठी स्वीकारतो. हे हस्तलिखित किंवा अलीकडच्या काळात संगणकावरची सॉफ्ट कॉपी म्हणजे पुस्तकाची संहिता. पूर्वी लेखक पुस्तकाचा मजकूर हाती लिहीत असत किंवा क्वचित टंकलिखित करून देत असत. कधी मुद्रित कात्रणांच्या स्वरूपातही पाठवत असत. वर्तमानपत्रांत लिहिलेल्या सदरांची कात्रणं जोडून अनेक पुस्तकं तयार झालेली आपल्याला माहीत आहेत. हस्तलिखित असो, टंकलिखित असो किंवा सॉफ्ट कॉपी असो, संहितेच्या संपादनाची गरज असतेच, कारण त्याशिवाय पुस्तकाला चांगला घाट येऊ शकत नाही.

संहितेच्या संपादनाला सुरुवात करण्यापूर्वी संपादकानं संहिता एकदा संपूर्ण वाचून काढावी लागते. याला 'फर्स्ट रीडिंग' असं म्हणतात. या पहिल्या वाचनामुळे संपादनात नेमकं काय केलं पाहिजे ते लक्षात येतं. संपादनाचं धोरण ठरवण्याच्या दृष्टीनं काही निर्णय घ्यावे लागतात. संहितेतील निवेदन हे बोली भाषेत ठेवावं की ग्रांथिक भाषेत ठेवावं ते ठरवावं लागतं. काही विशिष्ट ग्रंथांसाठी शुद्धलेखन जुनं ठेवावं की नवीन हे ठरवावं लागतं. ह्या दोन्ही प्रकारांची उदाहरणं म्हणजे पॉप्युलर प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या गंगाधर गाडगीळांच्या 'लिलीचं फूल' ह्या कादंबरीत आधीच्या आवृत्तीत संपूर्ण निवेदन लेखी पद्धतीनं छापलं होतं (म्हणजे 'त्याने असे केले.') परंतु नंतरच्या आवृत्तीत ते संपूर्ण बोली पद्धतीनं बदलण्यात आलं (म्हणजे 'त्यानं असं केलं'). त्याचप्रमाणे डॉ० ग०त्र्यं०

देशपांडे यांच्या 'भारतीय साहित्यशास्त्र' ह्या ग्रंथाचा विषय लक्षात घेतला तेव्हा त्यात जुनं शुद्धलेखन असणं आवश्यक वाटलं आणि त्यासाठी तज्ज्ञांची मदत घेऊन संपूर्ण पुस्तकाचं जुन्या शुद्धलेखनात रूपांतर करून घ्यावं लागलं. हे त्या त्या विशिष्ट पुस्तकाच्या प्रकृतीच्या दृष्टीनं आवश्यक वाटलं म्हणून करण्यात आलं.

पहिल्या वाचनानंतर जे धोरणात्मक निर्णय घेतले जातात त्यांत संपादकीय संस्कारांचं स्वरूपही ठरवलं जातं. हे संस्कार कोणत्या प्रकारचे असावेत आणि ते कितपत आवश्यक आहेत, हे ठरवताना मजकुराचं स्वरूप, तसंच डोळ्यांसमोर असलेला वाचकवर्ग आणि मुद्रणप्रत तयार करण्यातील लेखकाचं कौशल्य या सर्व बाबी लक्षात घेतल्या जातात. त्याशिवाय लेखकाचा आणि प्रकाशकाचा झालेला पत्रव्यवहार, करारपत्र आणि हे हस्तलिखित यापूर्वी कुणा तज्ज्ञाला दाखवलेलं असल्यास त्याचा अहवाल ह्या सर्व गोष्टी तपासून त्यात संपादनाला उपयुक्त असे काही मुद्दे असल्यास त्यांची नोंद करावी लागते.

मुद्रणप्रतीसाठी संपादनाला सुरुवात करण्यापूर्वी लेखकाकडून काही प्रश्नांचा खुलासा मागवून घ्यावा लागतो. संहितेत मोठ्या प्रमाणावर सुधारणा करण्याची आवश्यकता वाटल्यास आधी लेखकाची परवानगी घ्यावी लागते.

संपूर्ण मजकूर काळजीपूर्वक वाचून त्यात पृष्ठक्रमांक दिले आहेत किंवा नाही, एकाच प्रकारचं शुद्धलेखन वापरलं आहे किंवा नाही, ज्या शब्दांची वैकल्पिक रूपं आहेत तिथे सर्वत्र एकच रूप वापरलं आहे किंवा नाही, विरामचिन्हांचा उपयोग हा सर्वत्र एकाच पद्धतीनं केला आहे किंवा नाही असे सर्व तपशील नोंदवले म्हणजे मग संपादकीय कामाची रूपरेषा ठरवता येते. वैकल्पिक रूपांचं उदाहरण म्हणजे जर 'प्राध्यापक' हा शब्द वापरायचा असेल तर काही ठिकाणी नुसतं 'प्रा०' किंवा काही ठिकाणी संपूर्ण 'प्राध्यापक' तर काही ठिकाणी 'श्रीयुत' किंवा 'श्री०' असं लिहून लेखनाची घडी बिघडवली जाते. म्हणून ही रूपं सगळीकडे सारखीच आली पाहिजेत याचं भाग ठेवावं लागतं.

संहितेच्या संपादनाचे दोन भाग पडतात. एक म्हणजे 'साहित्यिक संस्कार' ज्याला इंग्रजीत 'सब्स्टँटिव्ह एडिटिंग' म्हणतात आणि दुसरं म्हणजे 'तांत्रिक संस्कार' म्हणजेच ज्याला इंग्रजीत 'कॉपी एडिटिंग' असं म्हणतात. कुठल्याही संहितेचं ह्या दोन प्रकारांनी संपादन करावं लागतं.

सर्वसामान्यपणे आपण ज्याला 'संपादन' असं म्हणतो त्यात मजकुराचं पुनर्लेखन, पुनर्रचना किंवा विषय वेगळ्या प्रकारे मांडण्याच्या सूचना यांचा समावेश होतो. हे करताना संपादकाच्या कौशल्याचा कस लागतो. ह्या प्रकारचे संपादकीय संस्कार किती प्रकारचे आणि कोणत्या प्रमाणात असावेत याविषयी संपादकाला अंगभूत समज असावी लागते, किंवा ती अनुभवानं वाढवावी लागते. संपादकीय कात्रीचा उपयोग जबाबदारीनं पण तितकाच हळुवारपणे करावा लागतो. प्रत्येक संहिता ही वेगळी असते, त्या त्या लेखकाच्या

स्वभावाला अनुसरून लिहिलेली असते, त्यामुळे हे साहित्विक संस्कार सरसकटपणे सर्वांना सारखेच लावता येत नाहीत. त्याचे नियमही ठरवता येत नाहीत. या ठिकाणी मला 'स्नेहांकिता' या पुस्तकाचं उदाहरण द्यावंसं वाटतं.

माझ्या कामाच्या अगदी सुरुवातीच्या दिवसांत माझ्याकडे स्नेहप्रभा प्रधान यांनी लिहिलेलं 'स्नेहांकिता' हे हस्तलिखित आलं. हे एक वेगळ्या प्रकारचं आत्मचरित्र होतं. त्यात ४७५ हस्तलिखित पानं होती आणि ती स्नेहप्रभाबाईंनी एका दु:खाच्या आवेगात लिहिलेली होती. त्या आवेगामुळे पुस्तकाचा घाट काहीसा विस्कळित झालेला होता. ह्या पुस्तकाचं संपादन वेगवेगळ्या पद्धतीनं करावं लागलं. त्याच्यात पुनरुक्ती आणि पाल्हाळ खूप होता; एकच प्रसंग वारंवार सांगितला जात होता. त्यांचं अशा प्रकारचं हे पहिलंच लेखन असल्यामुळे त्यांना आपल्या मनातला विचार कसा मांडावा याची पुरेशी कल्पना नव्हती. तसंच त्यांचं मराठी, इंग्रजी, हिंदी, गुजराती ह्या सर्व भाषांवर प्रभुत्व असल्यामुळे त्या भाषांची आणि वाक्प्रचारांची सरमिसळ झालेली होती. त्या सर्वांमधून एक सलग, सुसूत्र संहिता तयार करण्यात जवळजवळ सहा महिने गेले. त्यासाठी वारंवार स्नेहप्रभा-बाईंशी चर्चा करणं, आपला मुद्दा पटवून देणं, मला काय हवंय ते समजावून देणं, त्याला अनुसरून त्यांच्याकडून पुनर्लेखन करून घेणं, काही उताऱ्यांची किंवा परिच्छेदांची निर्दयपणे काटछाट करणं - अर्थात त्यांची अनुमती घेऊनच - असा त्या संहितेसाठी खूप खटाटोप करावा लागला. शेवटी आम्ही ती संहिता ४७५ पानांवरून २४० पानांचं पुस्तक होईल इतक्या आकारात संपादित केली. संपादकानं ह्या सर्व गोष्टींचं भान ठेवलं तरच पुस्तक वाचनीय होऊ शकतं.

पुण्याच्या कल्पना प्रेसमध्ये आमची पुस्तकं छापून घेण्यासाठी मी नेहमी येत असे तेव्हा चिं०स० ऊर्फ अण्णासाहेब लाटकर यांच्याशी परिचय झाला आणि पुढे संबंध घनिष्ठ झाले. त्यांचं नेहमी सांगणं असे की कुठल्याही लेखकाला आपण लिहून दिलेल्या मजकुरात काटछाट किंवा फेरबदल करायला आवडत नाही. कारण आपण लिहिलं आहे ते सर्व 'अक्षर वाङ्मय' आहे अशी त्याची ठाम समजूत असते. बदलाला नकार देणारा तोच लेखक प्रत्येक वेळी त्याच्याकडे प्रुफं तपासायला गेली की मात्र आधीच्या मजकुरात अधिक भर घालतो आणि मुद्रकाचं काम कठीण करून ठेवतो. अशा वेळी संपादकाची जबाबदारी फार वाढते. प्रत्येक लेखकाला वेगवेगळ्या पद्धतीनं चुचकारून घ्यावं लागतं आणि आपल्याला आवश्यक वाटतील ते बदल त्याच्याकडून करून घ्यावे लागतात. परंतु त्याच वेळेला हेही भान राखावं लागतं की लेखकानं जो आशय व्यक्त केला आहे त्यात फार काटछाट करता कामा नये. म्हणजे लेखक हा प्रथम महत्त्वाचा तर संपादक हा दुय्यम महत्त्वाचा आहे.

अशा प्रकारचे साहित्यिक संस्कार करताना संपादकाला मजुकराशी संबंधित

वेगवेगळ्या पैलूंचं भान ठेवावं लागतं. एक म्हणजे त्यात क्लॅरिटी किंवा स्पष्टता आहे की नाही; दुसरं म्हणजे प्रिसीजन किंवा नेमकेपणा आहे की नाही; तिसरं म्हणजे बॅलन्स किंवा समतोल आहे की नाही. तसंच व्याकरण किंवा शैलीच्या नियमांत सुसूत्रता आहे की नाही हेही बघावं लागतं. एका प्रकारे संपादक हा साक्षेपी समीक्षक असावा लागतो. तो लेखकाच्या कृतीतला योग्य तो अर्थ शोधून काढतो आणि तो अर्थ वाचकापर्यंत अधिक चांगल्या रीतीने पोचवण्यासाठी त्यावर मेहनत घेतो. त्यासाठी मूळ मजकूर पुन्हा पुन्हा वाचतो आणि तो तर्काच्या कसोटीवर घासून पाहतो. तसंच त्याची मांडणी आणि रचना योग्य रीतीने झाली की नाही हे पारखून घेतो.

संपादनाच्या तांत्रिक संस्कारांना सुरुवात करण्यापूर्वी एक महत्त्वाचं काम संपादकाला करावं लागतं ते म्हणजे त्या विशिष्ट संहितेसाठी स्टाइल-शीट किंवा विशिष्ट सूचनापत्रक तयार करणं. ही एक अतिशय महत्त्वाची आणि आवश्यक अशी बाब आहे. सगळे संपादक करतातच असं नाही; पण करावं असा आमचा आग्रह आहे. प्रत्येक संहितेत संपादनाची सुसूत्रता राखली जावी म्हणून आणि संपादकाच्या स्मरणशक्तीवर अवलंबून राहावं लागू नये म्हणून असं 'स्टाइलशीट' करणं आवश्यक आहे. यामध्ये अनेक मुद्दे येतात. त्या विशिष्ट संहितेतील विशिष्ट शब्द कसे लिहिले जावेत - उदा० जोतीराव की ज्योतीराव, कुलकर्णी की कुळकणी, ब्रेश्त की ब्रेख्ट, शेक्सपीयर की शेक्सपीअर यांचा नीट विचार करून नोंद करावी. हे शब्द मुद्रणप्रतीत कुठे येतात, निदान त्यांचा पहिला उल्लेख कोणत्या पानावर येतो त्याची नोंद करावी. मुद्रणप्रत तयार करत असताना ह्या सूचनापत्रकाचा वारंवार उपयोग करावा. टिपा आणि तळटिपा, आकृत्यांचं वर्णन (फिगर लेजंड्स), नकाशांतली नावं, तक्ते आणि या प्रकारचा मजकूर तपासताना ह्या सूचनापत्रकाचा जरूर उपयोग करावा.

ह्या विशिष्ट सूचनापत्रकाचा उपयोग फक्त मुद्रणप्रत तयार करतानाच होतो असं नाही. संपादकाला किंवा प्रकाशकाला एकाच पुस्तकावर सलग काम करणं शक्य होत नाही. मुद्रणाच्या वेगवेगळ्या अवस्थांत असलेल्या अनेक पुस्तकांवर एकाच वेळी काम करावं लागतं. मुद्रणप्रतीवर संस्कार केल्यानंतर मुद्रितं तपासणं, सूची तयार करणं वगैरे अवस्था अनेक महिन्यांनंतर येण्याची शक्यता असते. शिवाय हे काम एकाच संपादकाकडे चालू राहील याची खात्री नसते. त्यामुळे विशिष्ट सूचनापत्रकाची प्रत ही त्या त्या पुस्तकाच्या फाइलमध्ये पुस्तक तयार होईपर्यंत राहणं आवश्यक आहे. या सूचनापत्रकाची एक प्रत मुद्रितशोधकालाही द्यावी लागते.

तांत्रिक संस्कारांचा एक महत्त्वाचा भाग म्हणजे मजकुराच्या मांडणीत व्याकरणाच्या किंवा भाषेच्या चुका झालेल्या असल्यास त्याकडे लेखकाचं लक्ष वेधणं हा आहे. तसंच लेखकाच्या मनातला भाव किंवा अर्थ वाचकापर्यंत योग्य रीतीनं पोहोचवण्यासाठी योग्य





अनुक्रमणिका

त्या सूचना करणं हेही संपादकाचं महत्त्वाचं काम आहे. एखादं वाक्य किंवा परिच्छेद मागेपुढे करणं, अनावश्यक मजूकर गाळणं किंवा एखाद्या वाक्याची जोड देणं, द्विरुक्ती किंवा पाल्हाळ टाळणं ह्या प्रकारच्या सूचना कराव्या लागतात. काही गृहीत बाबींचा खुलासा केल्याशिवाय वाचकाला बोध होत नाही असं लक्षात आल्यास त्याचा खुलासा करावा लागतो.

व्यक्तिविषयक उल्लेख मजकुरात पहिल्यांदा येतात तेव्हा संपूर्ण नाव द्यावं - जसं श्री०पु० असं न म्हणता श्री०पु० भागवत, जी०ए० असं न म्हणता जी०ए० कुलकर्णी किंवा मास्तर असं न म्हणता मास्तर कृष्णराव फुलंब्रीकर, नुसतं पटेल असं न म्हणता वल्लभभाई पटेल की विठ्ठलभाई पटेल याचा खुलासा करावा.

मजकुरात उपशीर्षकं असल्यास ती एकमेकांशी सुसंगत आणि अर्थपूर्ण आहेत की नाही हे तपासावं लागतं. याच पद्धतीनं अन्योन्य संदर्भ, तपशिलांची पुनरुक्ती हे बारकाईनं तपासून मांडणी मुद्देसूद करावी. अवतरणे दिली असल्यास अवतरणचिन्हं आणि अवतरण देण्याची पद्धत सुसंगतरीत्या वापरली आहेत की नाही हे तपासावं.

अनुवादित पुस्तकांच्या संहितेचं संपादन करताना संपादकाला एक पाऊल पुढे जावं लागतं. त्याला मूळ पुस्तक वाचून बघावं लागतं. हिंदी, इंग्रजी भाषांतील पुस्तकांबाबत हे शक्य आहे. कधीकधी मूळ भाषेतल्या एकाच शब्दाचे दोन वेगवेगळे अर्थ होत असतील तर संदर्भ ध्यानात घेऊन कुठला अर्थ स्वीकारायचा हे ठरवावं लागतं. उदाहरण द्यायचं झालं तर इंग्रजीमधील ‘कॅटॅरॅक्ट’ (cataract) ह्या शब्दाचे दोन टोकाचे दोन अर्थ आहेत. (१) मोतिबिंदू (डोळ्याचा विकार); (२) धबधबा. ह्याचा संदर्भ ध्यानात घेता मोतिबिंदूच्या ठिकाणी धबधबा घेतला तर अनर्थ होईल. तसेच इंग्रजीत to blow one's nose याचा अर्थ नाक शिंकरणे असा न घेता नाक फेंदारणे असा घेतला तरी अर्थापलाप होईल म्हणून संपादकाला मूळ संहिता वाचून तिच्याशी अनुवाद ताडून बघावा लागतो.

वाचकाचे वाचन सुकर व्हावे हा उद्देश डोळ्यांसमोर ठेवून संपादकाने ही काळजी आधीच घेतली पाहिजे. मुद्रणप्रत तयार करताना, संहितेचं संपादन करताना वाचकाला डोळ्यांसमोर ठेवून संपादकानं ही काळजी घेतली पाहिजे.

शास्त्रीय पुस्तकांमध्ये, इतिहासाशी किंवा समाजशास्त्राशी संबंधित पुस्तकांमध्ये टिपा आणि तळटिपा यांचं संपादन हाही एक महत्त्वाचा भाग आहे. त्यात संदर्भ, संदर्भातील सारखेपणा, संदर्भ देण्याची पद्धत, मुख्य मजकूर आणि टिपा यांमधील सुसूत्रता अशा अनेक बाबींकडे काळजीपूर्वक लक्ष द्यावं लागतं. मजकुरात दिलेले टिपांचे संदर्भ-क्रमांक आणि प्रत्यक्ष टिपा या संपादकाने अतिशय काळजीपूर्वक ताडून पाहायला हव्यात. त्यांच्यात क्रमांकाचा घोटाळा झाला तर त्यामुळे तो संदर्भही चुकीचा लागू शकतो आणि त्यामुळे वाचकाच्या ज्ञानात फरक पडू शकतो. टिपा आणि ग्रंथसूची यांचा अन्योन्य संदर्भ

संपादकानं ताडून पाहावा आणि काही शंका आल्यास लेखकाला विचारून सुधारणा करावी. संपादक हा सर्वज्ञ असू शकत नाही; पण संपादकाला अनेक विषयांचं ज्ञान असणं आवश्यक आहे. याच पद्धतीनं ग्रंथसूची, तक्ते, आकृत्या आणि त्यांची शीर्षकं यांचंही संपादन अत्यंत काळजीपूर्वक करावं.

संपूर्ण हस्तलिखितातील/ संहितेतील मजकुराचं शुद्धलेखन तपासणं ही संपादकाची फार मोठी जबाबदारी आहे. त्यासाठी त्याचं व्याकरणावर प्रभुत्व असणं आवश्यक आहे, आणि जरूर तिथे संदर्भग्रंथांचा वापर करणंही आवश्यक आहे. मराठी व्याकरणासाठी शब्दकोश, तसंच संदर्भासाठी इंग्रजी-मराठी शब्दकोश, संस्कृत-मराठी शब्दकोश, विश्वकोश, संस्कृतिकोश यांचा नियमित उपयोग करावा. या कोशांमध्ये आता सत्त्वशीला सामंत यांच्या 'शब्दानंद' या कोशाचाही अंतर्भाव करावा लागेल. आधी म्हटल्याप्रमाणे अरुण फडके यांचा 'मराठी-लेखन-कोश', मो०रा० वाळंबे यांचं 'मराठी शुद्धलेखन-प्रदीप', एस०व्ही० सोहोनी यांची डिक्शनरी, गीर्वाण लघुकोश, अभिनव शब्दकोश अशा पुस्तकांचा संपादकाने आवर्जून उपयोग करावा. आता त्यात आमच्या 'रीतिपुस्तका'चाही समावेश करावा असं मी आग्रहानं सांगेन.

आपण मला जो विषय दिलेला आहे. त्यात संहिता-संपादनाचं स्वरूप आणि पथ्ये असं म्हटलेलं आहे. ही पथ्ये काय असावीत असा विचार करताना लक्षात आलं की संपादकानं लेखकाच्या/ संहितेच्या मूळ आशयाला धक्का न लावता पुस्तकाची गुणवत्ता/ अधिकाधिक वाढवण्याच्या दृष्टीनं जे प्रयत्न करता येतील ते केले पाहिजेत. त्यासाठी लेखकाशी चर्चा करून, आपला मुद्दा पटवून देऊन जरूर ते फेरफार करून घेतले पाहिजेत. या पद्धतीनं काम केल्यास पुस्तकाची गुणवत्ता निश्चितच वाढू शकते.

संपादक हा लेखक आणि वाचक यांच्यामधला सेतू असतो किंवा दुवा असतो हे भान विसरता कामा नये. संपादक हा लेखकाच्या जितका जवळचा असतो तितकाच तो वाचकाच्याही जवळचा असतो आणि वाचकाला आपलंसं करून घेण्यासाठी लेखकाला त्याच्या लेखनात थोडी मुरड घालून का होईना, बदल करण्यासाठी प्रवृत्त करणं यासाठी संपादकाला वाचकाचा पुढे होणारा फायदा डोळ्यांसमोर ठेवणं आवश्यक आहे.

दुसरं एक पथ्य म्हणजे आधी म्हटल्याप्रमाणे संहिता-संपादनाला अतिशय उपयुक्त असं 'स्टाइल-शीट' (विशिष्ट सूचनापत्रक) बनवणं आणि त्याचा सतत उपयोग करणं. पुस्तक सुसंगत, एकसंध, बांधेसूद होण्याचा दृष्टीनं त्याचा खूप उपयोग होतो.

संहिता-संपादन ह्या विषयाचे काही पैलू मांडण्याचा मी प्रयत्न केलेला आहे आणि ह्या निमित्तानं सत्त्वशीला सामंत हिला श्रद्धांजली वाहण्याची संधी आपण मला दिलीत याबद्दल मी कृतज्ञ आहे.

■

# मराठी छंद-विचार : परंपरा आणि नवता

- शुभांगी पातुरकर

मराठी भाषेतील छंदोविचाराचा आढावा घ्यावयाचा झाला तर तो प्रामुख्याने तात्त्विक/सैद्धांतिक आणि उपयोजित अशा दोन पातळ्यांवरून घ्यावा लागेल. यात विविध मराठी नियतकालिकांतून वेळोवेळी प्रसिद्ध झालेले छंद:शास्त्रविषयक लेखन, तसेच छंद:शास्त्रविषयक विविध प्रश्नांबाबत वेगवेगळ्या काळात झडलेले विविध वाद आणि छंद:शास्त्रावरील ग्रंथ हा तात्त्विक/सैद्धांतिक भाग एकीकडे आहे. तर दुसरीकडे उपयोजित भागात मराठीत परंपरेने चालत आलेल्या जुन्या छंदांपासून ते आजच्या मुक्तछंदातील कवितांपर्यंतचा विस्तृत पट आहे. याचाच अर्थ विविध छंदोविवेचकांची एतद्विषयक मतप्रणाली, कालौघात तिच्यात घडत गेलेली स्थित्यंतरे, आणि त्याच्या जोडीला कविवर्गाची प्रत्यक्ष काव्यविषयक कामगिरी अशी दुहेरी पडताळणी आपल्याला करावी लागेल. मराठी भाषेतील छंदोविचाराला असलेले हे दोन्ही पैलू लक्षात घेतले तर मराठी छंदोविचाराचा अभ्यास शक्य होईल आणि त्याचा विकासक्रमही शोधता येईल.

: १ :

अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा अभ्यास अनेकानेक अंगांनी झालेला असला तरी सुमारे नव्वदच्या दशकापर्यंत कवितेचे छंद:शास्त्रीय अंग लक्षात घेऊन काव्याचा अभ्यास झालेला दिसत नाही. मराठीत मुळातच धंदोविचार हा मराठीतील अन्य प्रकारची समीक्षा आणि साहित्यविचार यांच्या तुलनेने कमी झाला आहे. छंद:शास्त्रावरील मराठी ग्रंथांची यादी बघता ही बाब स्पष्ट होते. निरंजन माधवाची 'सद्‌वृत्तमुक्तावली' (शके १६३०) 'महाराष्ट्रकवि' मासिकातून प्रकाशित झाली. हा मराठी छंद:शास्त्रातील पहिला प्रकाशित ग्रंथ म्हणता येईल. याशिवाय रंगनाथ कावेरीकर यांचा 'वृत्तसुधाकर', मुकुंदाचा 'छंदोरत्नाकर', रामचंद्र दैवज्ञ यांचा 'छंदोमंजिरी' इ० ग्रंथ उपलब्ध आहेत. परशुरामतात्या गोडबोले यांचे 'वृत्तदर्पण' हे शालेय पुस्तक सुपरिचित आहे. त्यातून त्यांनी अभंग, ओवी, साकी, दिंडी यांचा परामर्श घेतला आहे. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांची 'मराठी छंद' ही पुस्तिकाही प्रकाशित आहे. त्यात त्यांनी चूर्णिका, सवाई, छप्पा, साकी, दिण्डी, घनाक्षरी, कटाव, अभंग आणि ओवी इ० मराठी छंदांचे विवेचन करण्याचा प्रयत्न केला आहे. गणेश विष्णु देशपांडे यांचा 'साहित्यकुसुमांजली' अथवा 'छंदोलंकार' हा ग्रंथ १९१२ मध्ये प्रकाशित झाला. याच्या पूर्वार्धात छंदोविवेचन असून त्याला 'छंदोगंगाधरी'

असे नाव लेखकाने दिले आहे. हा भाग सविस्तर असून त्यातून फटके, कटाव, लावण्या इ० पद्यप्रकारांची ओझरती ओळख लेखकाने करून दिली आहे. पद्याला लयबद्धतेची आवश्यकता असते या गोष्टीची जाणीव प्रथम याच छंद:शास्त्रकाराला झालेली आहे. ''छंद अगर वृत्ते यांना ताल व सूर यांचे साहाय्य पाहिजे असल्याने प्रस्ताराने सिद्ध होणाऱ्या असंख्य वृत्तांपैकी जी वृत्ते ताल व सूर यावर म्हणता येतील त्यांना पद्य म्हणावे; आणि जी तशी सहसा म्हणता येणार नाहीत त्यांना गद्य म्हणावे हे उत्तम. मग गद्यामध्ये सरळ असणारी वाक्यरचना त्यात असो वा नसो,'' असे ते म्हणतात. (पृ० ६)

डॉ० माधवराव पटवर्धन यांचा 'छंदोरचना' हा ग्रंथ प्रकाशित होईपर्यंत मराठी भाषेत छंद:शास्त्रावर जे लेखन झाले ते गुणात्मक आणि संख्यात्मक दोन्ही दृष्टींनी उणे असेच होते. गुणात्मक म्हणायचे ते या अर्थाने की वि०ज० सहस्रबुद्धे, गोविंदराव खाजगीवाले, ना०ग० जोशी, भ०श्री० पंडीत, ग०रा० हवलदार, श्री०ना० बनहट्टी, अरविंद मंगरूळकर, रा०ना० ब्रह्मनाळकर, चैतन्य देसाई, बाबूराव जोशी यांच्यासारख्या अधिकारी व्यक्तींचे या विषयावरील मौलिक लिखाण डॉ० पटवर्धन यांच्या 'छंदोरचने'नंतरच घडले आहे. परशुरामतात्या गोडबोले यांचे 'वृत्तदर्पण' सुबोध वृत्तपरिचयासाठी प्रसिद्ध असले तरी त्याचे स्वरूप शालेय होते. वि०का० राजवाडे यांचे 'मराठी छंद' हे पुस्तक शके १८४८मध्ये प्रकाशित झाले. त्यात मराठी छंदांचे विवेचन आलेले असले तरी ते साधार नाही. त्यामुळे ते निर्णायक समजता येत नाही. सर्वात महत्त्वाची बाब म्हणजे अक्षरछंद हे लगत्वभेदातीत (लघु-गुरु अक्षरांतील भेद म्हणजे लगत्वभेद) आहेत. हे ध्यानात न घेतल्याने ते विवेचन सदोष झालेले आहे. छंद:शास्त्राचा ज्ञात इतिहास समारे १,५०० वर्षांचा मानला जातो. मात्र एवढ्या कालावधीत जे अनेकानेक व्यासंगी छंद:शास्त्रज्ञ होऊन गेले, त्यापैकी छंदोरचनेसाठी लयबद्धतेची आवश्यकता असते ही बाब कुणाच्याच लक्षात आली नव्हती. बहुतेक जुन्या छंद:शास्त्रज्ञांची प्रज्ञा जुन्या वृत्तांना नवी नावे देण्यात व त्या वृत्तात काव्य करण्यात खर्च झाली आहे. तत्कालीन नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले छंद:शास्त्रीय लेखन व छंद:शास्त्रीय वाद यावर एक नजर टाकली तर छंद:शास्त्रावर होणारी चर्चा कशा स्वरूपाची होती यावर प्रकाश पडू शकेल. ''ओवी, अभंग, दिंडी हे छंद अस्सल मराठी की कानडी?'' (अ०का० प्रियोळकर, सह्याद्री, ऑ० १९३७); 'साकीचे लक्षण' (वि०ज० सहस्रबुद्धे, विहंगम, जून १९३८); 'अभंगाचा छंद कोणता?' (वि०ज० सहस्रबुद्धे, सह्याद्री, मार्च १९३७,); 'दिंडी छंदाचे शास्त्रशुद्ध लक्षण' (गोविंदराव खाजगीवाले, सह्याद्री, डिसें० १९३८) यांसारख्या नुसत्या शीर्षकांवरून मराठी छंद:शास्त्र हे कसे विशिष्ट आवर्तात रेंगाळत होते याची कल्पना येईल. कोणी वृत्ते देतो, कोणी थोडी वा पुष्कळ लक्षणे सांगतो. कोणी पिंगलोक्त त्रिकावलंबी पद्धत घेतो, तर कुणी स्वत:ची परिभाषा निश्चित करून त्या भाषेत सांगतो. कोणी दुसऱ्याची उदाहरणे देतो.

तर कोणी ती स्वत: रचून घालतो. पण वाङ्मयमंथन करून छंद:प्रकार कसे परिणत होत गेले याचे विवेचन मात्र कोणी करीत नाही. आपल्या विवेचनाला आधार देण्याची गरजही कोणाला वाटत नाही. डॉ० माधवराव पटवर्धन यांच्या 'छंदोरचने'ची पहिली आवृत्ती १९२७मध्ये प्रकाशित होईपर्यंत छंद:शास्त्राचा अभ्यास हा अशाप्रकारे बहुश: परंपरागतच राहिला. म्हणजे संस्कृतमधील अक्षरगणव्यवस्थेला अनुसरून असलेल्या वृत्तबद्ध काव्यापुरताच हा विचार मर्यादित होऊन राहिला होता. 'छंदोरचना' या ग्रंथाच्या प्रकाशनानंतर परिस्थिती बदलण्यास सुरुवात झाली. 'छंदोरचना' हा ग्रंथ तयार होण्याचा जो कालखंड होता त्यात त्यांचेच शब्द योजून म्हणायचे झाले तर, ''मराठी कवितेने वृत्तक्षेत्राच्या बाहेर छंद व जाती यांच्या अंगणात कितीतरी रमणीय विलास केले होते.'' ['पद्यप्रकाश' (१९३८), प्रस्तावना, पृ० १] अक्षरगणवृत्तांतील बऱ्याचशा एकसुरी अशा स्थूल आणि नियमित लयतत्त्वापेक्षा मात्रावर्तनी जाती आणि अक्षराधिष्ठित छंद यांतून लयतालांचे विविध विभ्रम प्रकर्षाने बहरताना दिसत होते. मुक्तछंद तेव्हा नुकताच उदयाला येत होता आणि प्रयोगावस्थेत होता. मराठी भाषेतील या सगळ्या रूढ आणि नव्या छंद:प्रकारांची साक्षेपी नोंद पहिल्यांदा डॉ० माधवराव पटवर्धन यांनी घेतली. त्यांनी पद्यरचनेच्या मूळ पायाची निश्चिती अक्षर उच्चारणाच्या मात्रिक कालभाराप्रमाणे (सिलॅबिक क्वांटिटी) केली व लयतत्त्व समग्र पद्यरचनेच्या निर्मितीला आवश्यक मानले आणि ते समग्र मराठी पद्यरचनेला लावून दाखविले. अशाप्रकारे त्यांनी ''पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना'' हे तत्त्व शोधून काढून त्यावर मराठी छंद:शास्त्राची व्यापक व पायाशुद्ध अशी घटना निश्चित केली. अशाप्रकारे शास्त्रीय बैठकीवरून छंदाच्या मूलतत्त्वाचा व्यापक आणि सर्वव्यापी विचार करतांना त्यांनी भरत-पिंगलादी संस्कृत छंद:शास्त्रकारांपासूनचे ग्रंथ अभ्यासून आणि संस्कृत व मराठी, प्राचीन आणि अर्वाचीन वाङ्मय डोळ्याखालून घालून वृत्तविचार, जातीविचार व अक्षरछंदविचार असा समग्र मराठी भाषेतील छंदविचार मांडला. त्यासाठी त्यांनी परंपरागत पिंगलोक्त त्रिक-पद्धतीने गणविभाजन न करता, पद्यरचनेच्या अंतर्घटनेचा अभ्यास करून, त्यांची आवर्तने ओळखली व त्या आवर्तनांनुसार अष्टमात्रिक (पद्मावर्तनी), सप्तमात्रिक (अग्न्यावर्तनी), षण्मात्रिक (भृंगावर्तनी) व पंचमात्रिक (हरावर्तनी) गणांत पद्यरचनेचे नवे पृथ:करण मांडले. हे करीत असताना ओवी, अंभगादी छांदस रचनेतील लगत्वभेदाचे तत्त्व त्यांच्या लक्षात आले. या लगत्वभेदातील रचनेला त्यांनी 'छांदस रचना' हे नाव दिले. अशाप्रकारे मराठी छंदोरचनेची त्रिविधता निश्चित करून समकालीन आधुनिक कवितेतील अशा प्रकारच्या छांदस आविष्कारांचे स्वरूपही लक्षात घेतले. परिणामस्वरूपी मराठी छंद:शास्त्र हे केवळ गतकालीन, ऐतिहासिक आणि केवळ विद्वानांपुरते मर्यादित असलेले अभ्यासाचे क्षेत्र न राहता त्याला वर्तमानाचा जिवंत संदर्भ प्राप्त झाला. मराठी छंद:शास्त्राच्या संदर्भात ही घटना अपूर्व होती. 'पद्य

म्हणजे लयबद्ध अक्षररचना' हा सिद्धांत मांडून त्यांनी मराठी छंद:क्षेत्रात मोठी कामगिरी बजावली, ती मराठी छंदोविचारांना पुढे नेणारी ठरली.

त्यांच्या 'छंदोरचने'मुळे कोणत्याही शास्त्राभ्यासासाठी आवश्यक असलेली काटेकोर, शिस्तबद्ध आणि विशिष्ट दिशेने विषयाचा आढावा घेण्याची पद्धत मराठी छंद:शास्त्रात अवतरली. अभ्यास-विषयाचे समग्र परिशीलन, माहितीचे संकलन, पृथ:करण व साधार विवेचन करण्याची आधुनिक पद्धत त्यांनी मराठी छंद:शास्त्रात रूढ केली.

'छंदोरचना' या ग्रंथाला मराठी छंद:शास्त्राचा इतिहासात छंद:शास्त्रीय आणि वाङ्मयीन असे दुहेरी मोल तर आहेच; पण या ग्रंथाचे आणखीही महत्त्व आहे. या ग्रंथाची पहिली व दुसरी आवृत्ती अनुक्रमे १९२७ व १९३७ साली प्रकाशित झाली. मराठी मुक्तछंदीय कवितांचा हा प्रभातकाल होता. मराठी मुक्तछंदाचे प्रवर्तक म्हणविणारे अनिल, पु०शि० रेगे, वा०ना० देशपांडे, व्यंकटेश वकील, शालीनदत्त शिदोरे यांचे मुक्तछंदातील काव्य याच सुमारास प्रकाशात आलेले आहे. मुक्तछंदाचे प्रवर्तन ही मराठी काव्याच्या संदर्भात खळबळजनक घटना होती. काव्यध्येय, काव्याची आशयाभिव्यक्ती व परंपरागत त्रिविध छंदपद्धती या काव्यप्रांताशी निगडित अशा प्रश्नांचा मुळातून विचार करण्याची वेळ आली होती. डॉ० माधवराव पटवर्धन यांनी मांडलेल्या लयबद्धतेच्या सिद्धांताच्या निमित्ताने याबाबत चर्चा सुरू होऊन, या विषयाला चालना मिळाली.

मराठी पद्यरचनेत अनुस्यूत असलेल्या लयतत्त्वाच्या संशोधनाचे हे सूत्र डॉ० ना०ग० जोशी या छंद:शास्त्रज्ञाने पुढे चालविले. 'मराठी छंदोरचना : लयदृष्ट्या पुनर्विचार' (१९५५) या आपल्या प्रबंधग्रंथातून त्यांनी डॉ० माधवराव पटवर्धन यांच्या लयविषयक भूमिकेचा पुनर्विचार केला. त्यातून त्यांनी लयबद्धतेचे पद्यांतर्गत व्यापक स्वरूप विवेचक दृष्टीतून न्याहाळताना मराठी छंदोविचार आणखी पुढे नेला. हे करताना त्यांनी लयतत्त्वाचे व्यापक रूप, निसर्गातील लयतत्त्व, शारीरिक व मानसिक लयबद्धता, आदिकालीन लयबद्धता, लयतत्त्वाचे दृश्य व श्राव्य स्वरूप, मात्रा-ताल व लय यांचा अन्योन्य संबंध, वैदिक चरणातील लयतत्त्व, छंदातील लयाविष्कार या सर्व मुद्यांबरोबरच लयत्त्वाच्या शास्त्रशुद्ध स्वरूपाची चर्चा केली. त्यामुळे व्यापक अर्थाच्या लयीची, आणि छंदोरचनेत गतिरूपाने अस्तित्वात असणाऱ्या लयीची चर्चा घडून एतद्विषयक बऱ्याच प्रश्नांची समाधानकारक उत्तरे मिळण्यास मदत झाली आहे. डॉ० माधवराव पटवर्धन यांनी लयतत्त्व समग्र पद्यरचनेच्या निर्मितीला आवश्यक तर मानले; पण लयतत्त्वाचे व्यापकत्व बघता पद्यरचनेमध्ये तिचा आविष्कार नेमका कसा होतो हे डॉ० ना०ग० जोशी यांनी दाखवून दिले; त्यांनी छंदोरचनेत जाणवणारी गती हा व्यापक अर्थाच्या लयीचा परिणाम मानून छंदोरचनेतील, लयीची पुनर्घटित व्याख्या केली. ''अक्षरांच्या, कालभारांच्या अनुरोधाने केलेल्या विशिष्ट परस्परसन्मुख योजनेमुळे जी एकप्रकारची गती पद्यात उत्पन्न होते ती

गतीच पद्याचे प्राणभूत तत्त्व आहे.'' (पुनर्विचार, पृ० ४३८). या त्यांच्या नव्या व्याख्येमुळे डॉ० माधवराव पटवर्धन यांच्या लयबद्धतेच्या सिद्धांतावर असणारा व्यापकतेचा आक्षेप दूर होण्यास मदत झाली. डॉ० माधवराव पटवर्धन यांनी मराठी छंदोरचनेची पायानिश्चिती अक्षर उच्चारणासाठी लागणाऱ्या मात्रिक कालमानावर करताना खास मराठी अशा छांदस रचना या लगत्वभेदातीत असून, त्यांचे उच्चारण द्वैमात्रिक असते म्हणजे सर्वच अक्षरे दीर्घोच्चारी असतात असे म्हटले होते. ('छंदोरचना', दु०आ०, पृ० १७.) मात्र त्यास पुरावा देण्याचे काम राहून गेले होते. डॉ० ना०ग० जोशी यांनी आपल्या प्रबंधग्रंथातील चौथ्या प्रकरणातून त्यास पुष्टी देण्याचे काम केले. मराठी अक्षरछंदांचे दीर्घोच्चारण वादातीत असल्याचे त्यांनी सप्रमाण सिद्ध केले.

याबरोबरच छंदातील लयबद्धता ही पुनरावर्तनात तशी वैचित्र्यातही असते आणि लयतत्त्व कालभारात्मक तसेच ते आघातात्मकही असते इ० बाबी त्यांनी ठळकपणे प्रतिपादिल्या. अनावर्तनी वृत्तातील लय डॉ० माधवराव पटवर्धन यांना जाणवली तर होती; पण तिथे पुनरावर्तन नसल्यामुळे तिची व्यवस्था त्यांना लावता आली नव्हती. ती या लयतत्त्वातील वैचित्र्यामुळे लावता येऊन त्यांचा लयबद्धतेचा सिद्धांत अबाधित राहिला. लयीचे आघातनिष्ठ तसेच आरोहावरोहयुक्त स्वरूप डॉ० ना०ग० जोशी यांनी दाखवून दिल्यामुळे मुक्तछंदातील सैल, सोईस्कर व काहीशा विकल्पाने येणाऱ्या, वैविध्यावर आधारलेल्या अपरंपरागत शैलीच्या छंदात अवतरलेल्या मुक्तछंदातील कवितेची छंद:शास्त्रदृष्ट्या सोयही लावता आली. अशाप्रकारे छंदोलयीबाबत त्यांनी अधिकारवाणीने दिलेला हा निर्वाळा मुक्तछंदाच्या संदर्भातही निर्णायक ठरला व मुक्तछंदाला छंद:शास्त्रात स्थान मिळाले - मग ते छंद मुक्त का असेनात!

छंद:शास्त्र हे सहजी निर्माण झालेल्या छंदांचे नियमन करून, तद्संबंधी विशिष्ट नियम सांगणारे शास्त्र असल्यामुळे छंद:शास्त्रात पूर्वापार सांगितले गेलेत तेवढेच छंद आहेत असे नव्हे; तर काव्य किंवा छंद ज्या लयबद्धतेवर आंदोलित होते, त्या लयबद्धतेचा आढळ होणारी सर्व रचना, तिची छंदोबद्धता पडताळून छंदात समाविष्ट केली जावी, यातच छंद:शास्त्राचाही विकास आहे, असे बजावून सांगणे ही छंद:शास्त्रज्ञाची जबाबदारी असते, ती डॉ० ना०ग० जोशी यांनी या ग्रंथाच्या निमित्ताने उत्तम रीत्या पार पाडली. त्यामुळेच डॉ० माधवराव पटवर्धनप्रणित लयतत्त्वविचार आधुनिक काळातील मराठी मुक्तछंदापर्यंत आणून भिडविणे त्यांना शक्य झाले.

अशाप्रकारे छंदविषयक विचाराला वर्तमानकाळाशी जोडत त्यास जिवंत चालना देण्याचे काम डॉ० ना०ग० जोशी यांनी केले. हे करताना त्यांनी खास देश्य छांदस आविष्कार, ग्रांथिक, भक्तीपर, शाहिरी व लौकिक रचना या सगळ्यांचा छंद:शास्त्रीय विचार करीत लयीचे मनमोकळे, व्यापक आणि लवचीक रूप लक्षात घेतले. त्याहीपुढे

जाऊन आधुनिक काळातील मुक्तछंदात्मक रचनांपर्यंत येऊन त्याबाबत एक स्वागतशील भूमिका त्यांनी घेतली. हे सारे मुक्तरचनाप्रकार आणि त्यांचे उपप्रकार यांचा 'मुक्तपद्य' या शीर्षकाखाली एक आराखडा तयार करून मराठीतील आधुनिक मुक्तरचनांची एक पद्यांतर्गत व्यवस्थाही त्यांनी उभी केली.

मराठी भाषेत आज जरी डॉ० माधवराव पटवर्धन यांच्या छंदोविचारांना मान्यता मिळालेली असली तरी त्या काळात मात्र त्यावर टीकेचे मोहोळ उठले होते. या ग्रंथातील विचार इतके क्रांतिकारक होते की असे झाले नसते तरच नवल! त्यातही डॉ० माधवराव पटवर्धन यांनी छंदोरचनेच्या पहिल्या आवृत्तीत ''पद्य म्हणजे तालबद्ध अक्षररचना'' असे म्हटले तर दुसऱ्या आवृत्तीत ''पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना ''असे म्हटले आणि याच आवृत्तीच्या इंग्रजी प्रस्तावनेत ताल-लय निदर्शक असा 'ऱ्हिदम' हा शब्द वापरला. त्यामुळे गोंधळ माजणे स्वाभाविक होते. या सर्व लिखाणामुळे छंदाचे छंदत्व नेमके कशात? तालात का लयीत? ताल व लय एकच का? ताल व लय हे शब्द संगीतशास्त्रातील, तालशास्त्रातील की छंद:शास्त्रातही लुडबुडणारे? इंग्रजी ऱ्हिदम मराठी पद्यरचनेला कितपत लागू? अशा प्रकारच्या प्रश्नावलींच्या आधारावर जी चर्चा सुरू झाली तिच्या योगाने मराठी छंदोविचारांत एकप्रकारचे मंथन सुरू होऊन निष्कर्षांचे नवनीत वर येण्यास मदत झाली. मराठी छंदोविचार लक्षात घेताना एक बाब आवर्जून ध्यानात घेतली पाहिजे ती अशी की डॉ० माधवराव पटवर्धन यांनी समग्र मराठी पद्यरचना लयतत्त्वाचा माग घेऊन तिची पुनर्बांधणी आरंभिली असता जिथे जिथे ही वीण काहीशी विसविशीत राहिली, नेमक्या त्या त्या ठिकाणी आक्षेप नोंदविले गेले आहेत. हे मराठी छंदोविचारातील सजगतेचेच चिन्ह समजले पाहिजे.

डॉ० माधवराव पटवर्धन आणि डॉ० ना०ग० जोशी यांच्या लेखनाला ऐतिहासिक मोल यासाठी आहे. मुक्तछंदासारखे अपारंपरिक, नवे छंद-प्रवाह मराठी काव्यसरितेला येऊन मिळत असतानाच काव्याच्या छंद:शास्त्रीय अंगाबाबत, त्यातील छंदत्वाबाबत, त्याच्या लयीबाबत अशाप्रकारचा सैद्धांतिक विचार या दोघांनी आपापल्या ग्रंथातून मांडला. हे मराठी मुक्तछंदाच्या चांगल्या प्राक्तनाचेच निदर्शक म्हणावे लागेल. त्यामुळे मुक्तछंदातील रचनांना लयबद्धतेचा सैद्धांतिक पाया तर मिळालाच; पण त्यांची व्यवस्था लावली जाऊन, त्यांना मराठी भाषेतील विशाल छंद:सागरात सामावून घेणेही त्यामुळे शक्य झाले. डॉ० ना०ग० जोशी यांचे छंद:शास्त्रावरील (१) 'मराठी छंदोरचना : लयदृष्ट्या पुनर्विचार' (स्वप्रकाशित प्रबंधग्रंथ, बडोदे, १९५५), (२) 'मराठी छंदोरचनेचा विकास' (मौज प्रकाशन, मुंबई, १९६४) आणि (३) 'तुलनात्मक छंदोरचना' (मौज प्रकाशन, मुंबई, १९६८), हे तीनही ग्रंथ म्हणजे मराठी छंद:शास्त्रीय अभ्यासातील मैलाचे दगड आहेत. या दोन्ही छंदोविवेचकांमुळे मराठी छंदोविचार पुढे जाण्यास मोलाची मदत झाली.

डॉ० ना०ग० जोशी यांनी आपल्या लेखनातून ऱ्हिदमच्या आघातात्मक व कालभारात्मक अशा विविध प्रकारांची केलेली चर्चा मराठी मुक्तछंदाच्या संदर्भात फार उपयुक्त ठरली. ऱ्हिदम हे खरोखरी एक व्यापक तत्त्व असून छंदाबाबत ते गतिद्वारा प्रत्ययाला येते. गतिविभ्रमामुळे आपल्याला जो आनंद होतो, तो त्या गतीतील समकालिक व समप्रमाण आंदोलनांमुळे होतो. ही गती फ्रेंचसारख्या केवळ कालभारात्मक मापाच्या रचनेत, ग्रीक-लॅटिनसारख्या लघुगुरुयुक्त भाषांतील पद्यात, तसेच इंग्रजीसारख्या आघात-विशेष असलेल्या पद्यातही आढळते. मराठी भाषा ज्या इंडोयुरोपीय भाषासंघात मोडते, त्या भाषासंघातील लयतत्त्वाचे अधिष्ठान अक्षरकालभारात्मकता (सिलॅबिक क्वांटिटी) आहे. आणि इंग्रजी ज्या जर्मेनिक भाषासंघात मोडते, त्या भाषासंघातील लयतत्त्व आघातप्रधान (ऱ्हिदम ऑफ स्ट्रेस) असले तरी इंग्रजी भाषेत या दोन्ही प्रकारचे लयतत्त्व आढळत असल्याचा दावा त्यांनी 'ऑक्सफर्ड न्यू इंग्लिश डिक्शनरी'चा हवाला देऊन केला आहे. याचा अर्थ इंग्रजी पद्यरचनेत त्यांच्या विशिष्ट आघात पद्धतीमुळे उद्भवणारे, संभवणारे ऱ्हिदम, आपल्या मराठी भाषेतही संभवू शकतात. त्यामुळे इंग्रजी ऱ्हिदमच्या साच्यात मराठी पद्यरचना ठोकून बसविण्याचा तत्कालीन विरोधकांचा आक्षेप आपोआपच रद्दबादल ठरला.

मराठी छंदोविचार पुढे नेण्यास या दोघा छंदोविवेचकांशिवाय अनेकांचा हातभार लागला. कवी पु०शि० रेगे यांनाही छंद:शास्त्रविषयक प्रगल्भ जाण होती. छंद:शास्त्राच्या विकासाचा विचार त्यांनी देखील केला होता. आपल्या एका लेखात ते म्हणतात, ''प्रचलित रचनेचे विशेष तपासून तिच्यात काही नवीन रचनातंत्र सापडते का ते पाहणे त्यांचे (छंदोविवेचकांचे) प्रमुख कार्य असायला हवे. नव्या रचनेचे केवळ नामकरण करून छंदाच्या संदर्भात आजवर मानल्या गेलेल्या लय, यती इत्यादी विशेषांची तीच तीच चर्चा करून हे साध्य होणार नाही. भाषेची मूळ घडण आणि तिच्यात कालांतराने होत जाणारे फरक, सांस्कृतिक परंपरेतील स्थित्यंतरे आणि त्यांचा वाङ्मयीन आणि एकंदर कलाविषयक अभिव्यक्तीवर होत असणारा परिणाम, रूढ अभिव्यक्तीला चिकटलेले 'संचित' झटकून टाकता येत नाही म्हणून नव्याने सांगण्याचे, व्यक्त करण्याचे होत असलेले प्रयत्न यांचा जितका साकल्याने विचार होईल तितका करून आजचे छंद:शास्त्र मांडायला हवे. हे असे करीत असताना विषयाच्या सूत्राला धरून मागे जावे लागले, जुन्या व्याख्या जर तपासून घ्याव्या लागल्या तर तेही अवश्य करायला हवे. परंतु केवळ जुना साचा घेऊन त्यात बसेल ती रचना छांदस, बसणार नाही ती अछांदस-किंबहुना उपेक्षणीय किंवा अविचारार्ह ही प्रवृत्ती शास्त्रीय म्हणता येणार नाही. छंद:शास्त्राने छंद ठरत नसून छंदाच्या परीक्षणातून छंद:शास्त्र सिद्ध होत असते हे केव्हाही विसरता कामा नये.'' ('छंद आणि छंद:शास्त्र', सत्यकथा, मे, १९६२, पृ० ७४)

---

आधुनिक काळातील मराठी मुक्तछंद हा याच छंदप्रवासातील पुढचा टप्पा आहे. रुचिवैचित्र्याची जन्मजात आवड आणि वेगवेगळे प्रयोग करून पाहण्याची मानवाची मूलभूत प्रवृत्ती, यांमधून जसे वेगवेगळे छंदप्रकार संभवले तद्वतच मराठीतील मुक्तछंददेखील निर्माण झाला. कवी अनिल हे मराठी मुक्तछंदाच्या चळवळीचे प्रमुख प्रणेते समजले जातात. वॉल्ट व्हिटमनच्या 'ओ कॅप्टन' या मुक्तछंदातील कवितेने प्रभावित होऊन मुक्तछंदात कविता लिहिण्यास ते प्रेरित झाले. (आ०रा० देशपांडे, 'दशपदी', प०आ०. मुंबई, १९७६, पृ० ३३) हे जरी खरे असले तरी मराठी मुक्तछंदाची चळवळ ही निव्वळ अनुकरणातून सुरू झालेली नाही. मनात दाटणाऱ्या भावकल्लोळांना जुने रूढ छंद यथोचित न्याय देऊ शकणार नाहीत, यथार्थ अभिव्यक्तीच्या दृष्टिकोनातून त्यांना मर्यादा आहेत याची जाणीव तत्कालीन अनेक मराठी कवींना झालेली दिसून येईल. स्वा० सावरकर यांनी आपल्या महाविद्यालयीन जीवनात मिल्टन आणि शेक्सपियर यांच्या ग्रंथांची आवडीने पारायणे केली होती. इंग्रजी 'ब्लँक व्हर्स'प्रमाणे मराठीत सुदीर्घ काव्यरचनेस अनुकूल असे प्रवाही वृत्त योजावे अशी कल्पना त्यांच्या मनात घर करून होती. ती 'वैनायक' वृत्ताद्वारे त्यांनी प्रत्यक्षात आणली. आपली प्रतिभा पारंपरिक छंदांपेक्षा वेगळ्या छंदात प्रकट करणाऱ्या या दोन प्रतिभाशाली कवींनी युरोपात चाललेल्या मुक्तछंद-चळवळीचा, तशा प्रकारच्या कवितांच्या वाचनातून निर्माण झालेल्या प्रभावाचा पगडा आपल्या मनावर पडल्याचे प्रांजळपणे कबूल केले आहे. परंतु हा प्रभाव ''अपूर्ण अपुले ईप्सित झाले पूर्ण जिथे भासे । मनुजाचे मन सहज पावते आकर्षण तेथे ।'' या उक्तीप्रमाणे होता. जुन्या छंदातील अडचणींची जाणीव होऊन, यथार्थ आविष्कारासाठी सोईस्कर व समर्थ अशा नव्या छंदाची आवश्यकता जाणवत असताना, युरोपीय कवींच्या अनुकरणाने त्यांनी मराठी छंदात बदल घडवून आणला. याचा अर्थ इथे निव्वळ अनुकरण वा नक्कल म्हणून मराठी छंदात बदल घडवून आणलेला नाही. युरोपीय कवींनी वापरलेल्या छंदातील सुटसुटीतपणा, त्यांनी घेतलेले छंद:स्वातंत्र्य आणि त्याचा प्रकटीकरणावर होणारा इष्ट परिणाम जाणवल्यामुळे, हा छंदबदल त्यांना आवश्यक वाटला. काव्याच्या प्रकटीकरणातील उत्स्फूर्तता आणि स्वाभाविकता जपणे त्यांना छंदबंधन पाळण्यापेक्षा अधिक महत्त्वाचे वाटले. साहजिकच त्यांच्या मनात रेंगाळणाऱ्या बदलाच्या कल्पनांना युरोपीय कविवर्गाच्या मुक्तछंदातील कवितांच्या वाचनाने चालना मिळाली.

कवी अनिलांना जरी मुक्तछंदाच्या चळवळीचे प्रणेते समजले जात असले तरी ही एक सामूहिक चळवळ होती. कारण मराठी काव्याच्या भरभराटीच्या दृष्टिकोनातून, तिच्यातील वैगुण्ये हेरून तिच्यात सोईस्कर बदल करण्यास सुरुवात एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात झालेली दिसून येते. तालबद्धता, स्मरणसुलभता, श्रुतिसुभगता या गुणांनी लोभावून प्राचीन कवींनी यमकांना आपल्या काव्यात अव्वल स्थान दिले खरे, पण पुढे

पुढे अतिरेक होऊ लागून यमकाचा काव्यप्रवाहास अडसर होऊ लागला. काव्यासाठी यमक न राहता यमकासाठी काव्य हा प्रकार होऊ लागला व तो अनेक कवींचा जाचक ठरू लागला. चिंतामणी पेटकर यांनी आपल्या 'गंगावर्णन' (इ०स० १८७४) काव्याला लिहिलेल्या प्रस्तावनेत एतद्विषयक विचार मांडले आहेत. ते म्हणतात, ''कोणत्याही भाषेत खरी कविता म्हटली म्हणजे तिला यमकाचेच काय परंतु छंदाचे साह्य देखील अवश्यभूत नाही. हे सांगण्याचे कारण इतकेच की या ग्रंथात यमकालंकारांकडे तादृश लक्ष दिले नाही. ग्रंथकाराने रचलेले प्रथमचे हे काव्य म्हणून यात यमकांचा अगदी अनादर करणे त्यास प्रशस्त वाटले नाही. परंतु पुढे मागे लवकरच मराठी काव्याच्या पायातली बेडी नाहीशी व्हावी अशी त्याची मन:पूर्वक इच्छा आहे. (चिंतामणी पेटकर, 'गंगावर्णन', प०आ०, पुणे, १९२३, पृ० २)

यमकाबाबतच नाही तर काव्य समचरणी असण्याच्या पूर्वापार चालत आलेल्या आग्रहाबाबतही त्यांनी या प्रस्तावनेत आपली मते स्पष्ट शब्दात नोंदविली आहेत. ते म्हणतात, ''आजपर्यंत ज्या ज्या कवींनी मराठी भाषेत श्लोकबद्ध ग्रंथ लिहिले, त्यांपैकी बहुतेकांनी प्रत्येक विचार एकाच श्लोकात आटोपण्याचा प्रघात पाडल्यामुळे त्यांच्या काव्याची खरी योग्यता पुष्कळ अंशी कमी झाली. जसे एखाद्या पलटणीत प्रत्येक शिपायाची उंची काही नियमित इयत्तेची असावी असे ठरवून, त्या इयत्तेपेक्षा अधिक उंच असतील त्यांचे पाय तोडल्याने व ठेंगणे असतील त्यास कृत्रिम पाय लावल्याने, ते सर्वच विद्रूप दिसू लागतील, तसेच त्यांच्या काव्याचे झाले आहे असे म्हटल्यास हरकत नाही. कारण सर्वच विचार नियमित अवकाशात दाखविता येतात असे नाही. कोठे निरर्थक भर घालावी लागणार आहे, कोठे अवश्यभूत भाग निरुपायतेमुळे काढून टाकावा लागणार आहे; परंतु त्याचा परिणाम किती वाईट होतो! काव्याची सरळ पद्धत जाऊन सर्व भाग ओढूनताणून रचिलेले दिसतात. त्यामुळे वाचणाऱ्याच्या मनावर जो ग्रह उत्पन्न करावयाचा हेतू असतो, तोही सिद्धीला जात नाही. यास्तव या ग्रंथात प्रत्येक विचाराला जितका अवकाश योग्य वाटला, तितक्यातच त्याचा समावेश करण्याचा यत्न केला आहे.'' (तत्रैव, उपोद्घात, पृ० १-२)

चिंतामणी पेटकर यांच्या विचारांची तपशीलवार नोंद घेण्याचे कारण असे, की मुक्तछंदाच्या चळवळीमध्ये आ०रा० देशपांडे, वा०ना० देशपांडे, स्वा० सावरकर, यांनी मुक्तछंदाची आवश्यकता प्रतिपादन करतांना, रूढ छंदांमध्ये जाणवणाऱ्या ज्या अडचणी निवेदन केल्या, त्या अडचणींची जाणीव कितीतरी अगोदर त्यांना झालेली यावरून दिसून येते. मुक्तछंदावरील पहिला लेख अनिलांनी 'वागीश्वरी'च्या शके १८५३च्या अश्विन-कार्तिक अंकात म्हणजे इ०स० १९३१मध्ये प्रकाशित केला. त्यामधील विचार चिंतामणी पेटकर यांनी इ०स० १८७४ साली व्यक्त केलेल्या विचारांशी मिळतेजुळते आहेत. याचा

अर्थ अनिलांच्या पूर्वी सुमारे ५० वर्षे काव्याच्या संदर्भातील असे क्रांतिकारक विचार व्यक्त केले गेले होते.

त्यांच्याप्रमाणेच महादेव मोरेश्वर कुंटे यांनी देखील आपली वैशिष्ट्यपूर्ण काव्यदृष्टी आपल्या 'राजा शिवाजी (इ०स० १८६५)या महाकाव्याला जोडलेल्या प्रस्तावनेतून प्रकट केली आहे. काव्यभाषा, समाजाची भाषा, काव्यातील अलंकरण, काव्याची स्वाभाविकता आणि समाजाची काव्याभिरुची या सर्व बाबींचा त्यांनी यातून जो उहापोह केला आहे तो मराठी मुक्तछंदाच्या संदर्भात फार महत्त्वाचा आहे. शैलीतील कृत्रिमता आणि व अलंकरणातील निरर्थकता याबद्दलची आपली परखड मते त्यांनी नोंदविली आहेत. मराठीत उच्चारानुसारी लेखन व्हावे, काव्यभाषा प्रचलित भाषेपेक्षा वेगळी असू नये, काव्यातील शब्द व त्यांची रूपे यावर काही निर्बंध असावेत, हे त्यांचे विचार, या संदर्भात पुढे भरीव कामगिरी करणाऱ्या श्रीराम अत्तरदे यांच्या कितीतरी आधी नोंदविले गेले आहेत.

मराठी मुक्तछंद दिवा लागावा आणि प्रकाश पडावा याप्रकारे प्रविष्टला नाही हे या सगळ्या लेखनावरून स्पष्ट होते. त्यासाठी बऱ्याच जणांचे, बऱ्याच आधीपासून केलेले प्रयत्न कारणीभूत ठरले. पारंपरिक काव्यक्षेत्रात व काव्यभाषेत केले गेलेले प्रयोग पुढे केशवसुतांना जसे उपयोगी पडले तद्वतच पारंपरिक काव्यपद्धतीला नि:संदिग्ध शब्दात विरोध करून नव्या अभिरुचीला अनुकूल असे वातावरण या सगळ्या लेखनाने तयार केले. मराठी काव्याच्या भरभराटीच्या दृष्टिकोनातून संभवणाऱ्या अडचणींची जाणीव वेगवेगळ्या प्रतिभावंतांना वेगवेगळ्या प्रकारे झाली व त्या अडचणी दूर करून मराठी काव्यौघ सुरळीतपणे वाहता राहावा यासाठी अनेकांनी प्रयत्न केले हे स्पष्ट होते. त्यामध्ये ए०पां० रेंदाळकर, घंटय्या नायडू, स्वा० सावरकर, श्रीराम अत्तरदे, व्यंकटेश वकील, शालीनदत्त शिदोरे, वा०ना० देशपांडे, पु० शि० रेगे, यांचे योगदान अनिलांइतकेच मोलाचे आहे. गतानुगतिकतेच्या वलयात फिरणारी मराठी कविता जर मूलरूपाने बदलायची असेल तर तिने तिचा जुना वेष टाकून द्यायला हवा ही या सगळ्यांची प्रामाणिक भावना होती व त्यानुसार आपल्या कवितेत त्यांनी आपापल्या समजुतीप्रमाणे हवा तो बदल घडविला.

आज मराठीत मुक्तछंद सर्रास रुळला आहे. तो मराठीत प्रविष्टला त्यालाही सुमारे शतक झाले. पूर्वापार चालत आलेल्या त्रिविध छंदप्रकारांपेक्षा तो वेगळा असल्याने सुरुवातीला त्याला बराच विरोध झाला. तो बाहेरून म्हणजे इंग्रजीतून आल्याने परका ठरला. त्याच्या छंदत्वाबद्दल शंका उपस्थित केली गेली. त्याच्या आवश्यकतेबद्दल प्रश्नचिन्ह उपस्थित केले गेले. त्यावर आक्षेपांचा भडिमार करण्यात आला. त्याच्या विविध प्रकारांबाबत मतमतांतरे नोंदविली गेली. सांगीतिक अर्थाच्या ताल-लयादी कल्पना त्यावर लादण्यात येऊन, त्या निकषांवर तो अगेय-गद्य ठरवून त्यास हिणवण्यात आले. मुक्तछंदात कविता करणाऱ्या कवींच्या कवित्वशक्तीबाबत संशय व्यक्त केला गेला. त्याच्या प्रथम

प्रवर्तकाबद्दल वादविवाद झडले. 'मुक्तछंद' या शब्दाचा कीस पाडण्यात आला. मुक्तछंदातील कवितांची टर उडवण्यात आली. थोडक्यात कोणतीही नवी गोष्टी अस्तित्वात येताना अटळ असलेला संघर्ष मुक्तछंदाच्याही वाट्याला आला. तत्कालीन प्रतिष्ठित मराठी कवी यशवंत, कविवर्य भा०रा० तांबे, माधव ज्युलियन यासारख्यांनी मुक्तछंदाच्या नावे नाक मुरडल्याने मुक्तछंदाच्या विरोधकांना बळ मिळाले आणि समर्थकांना मुक्तछंदाची बाजू अधिक हिरिरीने मांडावी लागली. बंगाली भाषेत रवींद्रनाथ, हिंदी भाषेत सुमित्रानंदन पंत, सूर्यकांत त्रिपाठी यांच्यासारखे दिग्गज कवी मुक्तछंदात कविता लिहित असल्यामुळे हिंदी मुक्तछंदाला त्यांच्या प्रतिष्ठेचा फायदा मिळाला तसे मराठी मुक्तछंदाबाबत झाले नाही. अनिल, पु०शि० रेगे, वा०ना० देशपांडे यांसारख्या मराठी कवींचे काव्यक्षेत्रातील स्थान निश्चित होण्यापूर्वीच त्यांनी मुक्तछंदात कविता लिहिणे सुरू केल्यामुळे त्यांच्या काव्यावर टीकेची झोड उठली. या कवींना कालांतराने लोकप्रियता मिळाली. साहजिकच त्यांची मुक्तछंदातील कविताही मागाहून स्थिरावली.

: २ :

ही झाली मराठी छंदोविचाराची सैद्धांतिक बाजू. आता त्याची दुसरी बाजू, म्हणजे प्रत्यक्ष छंद-प्रकार. विविध छंदोरचना बघण्यासाठी मराठी छंदोरचनांचा आढावा घेऊ.

मराठी पद्यरचना परंपरेने त्रिविध आहे. परंतु आता ती पंचविध झाली आहे.

(१) अक्षरगणवृत्त, (२) जातिरचना/मात्रावृत्ते आणि (३) अक्षरछंद या पारंपरिक तीन प्रकारांत आता (१) गद्योचारी छंद आणि (२) आधुनिक मुक्तछंद अशा प्रकारांची भर पडलेली आहे. मुक्तछंदाचेही (१) मात्रिक मुक्तछंद, (२) छांदस मुक्तछंद, (३) गद्योचारी मुक्तछंद व (४) मुक्तशैली असे चार उपप्रकार आहेत.

(१) अक्षरगणवृत्त : मराठी भाषेतील अक्षरगणवृत्त हे संस्कृत भाषेतून आलेले असून यात अक्षरसंख्या, लगक्रम, यति निश्चित असतो. बरीचशी जुनी मराठी कविता वृत्तबद्ध आहे. मोरोपंतांसारखे मराठी कवी प्रौढ, सुसंस्कृत, व्याकरणशुद्ध, भाषेत निरनिराळ्या कठीण वृत्तांत विपुल व सालंकृत रचना करण्यासाठी प्रसिद्ध आहेत. आजही मराठी भाषेत हे तुरळक का होईना; पण उपयोजिले जाते. ग्रेससारखे मान्यवर कवी याचा फार डौलदार वापर करताना दिसतात.

(२) जातिरचना किंवा मात्रावृत्त : जातिरचना किंवा मात्रावृत्त यात लगत्वभेद आहे. पण अक्षरसंख्या लवचीक आहे. यात अष्टमात्रक, सप्तमात्रक, षण्मात्रक व पंचमात्रक आवर्तने आढळतात. ही प्राचीन प्राकृत रचनापद्धती आहे. मराठीत प्राचीन काळापासून प्रौढ वाङ्मय अक्षरछंदांत रचले जात असताना संत मीराबाई, सुरदास, कबीर इ० उत्तर हिंदुस्थानातील संतगीतकारांच्या प्रभावाने वा उदाहरणाने मराठीतही पदे लिहिली गेली. ही सर्व जातिरचना आहे. तशी तर बहुतेक सर्वच संतांनी पदरचना केली आहे; पण

मराठीत पदे लिहिणारा पहिला मोठा गीतकार संत एकनाथ आहे. ही सर्व जातिरचना कीर्तनकारांनी गाऊन रूढ केली व भाविकांनी ती नित्य स्मरणात ठेवली. आनंदतनय, रघुनाथपंडित यांची आख्याने वृत्तबद्ध असली तरी त्यात अधुनमधून पदे विखुरलेली आहेत. मध्वमुनिश्वर, केशवस्वामी, नरहरीशिष्य वणीकर, देवनाथ, दयाळनाथ इ०ची जातिरचना वैपुल्याने आढळते. याशिवाय अमृतराय, कविराय रामजोशी, होनाजी बाळा, सगनभाऊ, प्रभाकर इ०नी केलेली पोवाडा, लावणी, कटाव, इ० पदरचना प्रसिद्ध आहे. अण्णासाहेब किर्लोस्कर यांनी गीतांच्या चालींना कीर्तनांतून, तमाशांतून सुशिक्षित रंगभूमीवर आणले. त्याची गोडी नवशिक्षित मराठी समाजाला तसेच उदयोन्मुख कवींना लागली. गोविंद बल्लाळ देवल यांची पदे सुरस आणि निर्दोष आहेत. आधुनिक मराठी कवितेतील छंद:शास्त्रीय शैथिल्य दूर करण्याचे बरेचसे श्रेय यांचे आहे. याशिवाय केशवसुत, गो०वा० कानिटकर, ना०वा० टिळक, विनायक जनार्दन करंदीकर इ०नी जातिरचना अर्वाचीन मराठी काव्यप्रांतात रूढ केली. अशा या लगक्रमनिष्ठ जातिरचनेच्या यदृच्छया आलेल्या मात्रावलींच्या सैल बांधणीतून पुढे मात्रिक मुक्तछंद तयार होतो.

(३) अक्षरछंद : छंद म्हणजेच अक्षरछंद हा खास मराठी भाषेचा विशेष छंद प्रकार आहे. संस्कृतात आणि प्राकृतात न आढळणारी ही लगत्वभेदातीत रचना आहे. मराठी भाषेच्या प्रभातकाळापासून ओवी, अभंग, घनाक्षरी यांसारख्या अक्षरछंदांतून रचना केली जात आहे. 'ज्ञानेश्वरी' हे त्याचे उत्तम उदाहरण आहे. मराठीत बहुतेक सर्व संतांनी ओवी, अभंग रचना केली आहे. या छंदाचे वैशिष्ट्य म्हणजे इथे सर्व अक्षरे सारख्याच दीर्घकाळात म्हणजे गुरूच उच्चारायची असतात. इथे मुख्य नियमन असते अक्षरसंख्येचे. प्रत्येक अक्षराचा उच्चारण काल दोन मात्रांचा असल्याने या प्रकारात अष्टमात्रक वा षण्मात्रक अशी दोन आवर्तनांची रचना संभवनीय असते. विशिष्ट अक्षरसंख्येच्या या नियमित छंदातून पुढे अनियमित अक्षरसंख्येचा छांदस मुक्तछंद तयार होतो.

मराठी 'छांदस ओवी'चे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे :

| | |
|---|---|
| देवाचिये द्वारी/ | ६ अक्षरे |
| उभा क्षणभरी/ | ६ अक्षरे |
| तेणे मुक्ती चारी/ | ६ अक्षरे |
| साधियेल्या/ | ४ अक्षरे |

(४) गद्योच्चारी छंद : हा गद्योच्चारातून निर्माण होणारा छंद आहे. मराठी भाषेतील पारंपरिक त्रिविध प्रकारची छंदोरचना ही अक्षरोच्चारणाच्या कालिक परिमाणावर आधारित आहे. गद्योच्चारी छंदात देखील लयीचे अधिष्ठान अक्षरोच्चारणातील कालिकताच आहे. फक्त इथे अक्षराऐवजी 'प्राक्षर' ही कल्पना आहे. गद्योच्चारात जसे निभृत स्वरांना स्थान नसते तसेच इथेही आहे. या रचनेतील प्रत्येक अक्षर हे इंग्रजी सिलॅबलच्या धर्तीचे म्हणजे

पूर्णोच्चारी असते. या पूर्ण उच्चार होणाऱ्या अक्षरांना 'प्राक्षर' संबोधून विशिष्ट प्राक्षरांच्या योगाने तयार झालेल्या चरणांच्या पुनरावृत्तीने हा नवा प्राक्षरसंख्येचा गद्योच्चारी छंदप्रकार तयार होतो. यात अक्षर उच्चारणाच्या सरासरी कालभाराचे तत्त्व सूचित आहे. अशा प्रकारच्या प्राक्षरी रचनेला म्हणजे 'गद्योच्चारी छंदाला' पु०शि० रेगे यांनी 'आक्षररचना' म्हटले आहे. या नियमित आवर्तनाच्या प्राक्षरी छंदातून पुढे सैल बांधणीचा गद्योच्चारी मुक्तछंद तयार होतो.

गद्योच्चारी छंदाचे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे. (पु०शि० रेगे, 'मैना गेली उडून', ''दोला'' पृ० ७४)

| अक्षरे | | प्राक्षरे |
|---|---|---|
| ९ | चा र दि व स आ ज झा ले | ६ |
| ७ | मै ना गे ली उ डू न | ६ |
| ७ | आ णी ना ही कु णा चं | ६ |
| ८ | का ही रा ह्य लं अ डू न | ६ |

यानंतर मराठी मुक्तछंदाची उदाहरणे येणेप्रमाणे सांगता येतील :

(१) छांदस मुक्तछंद :

छांदस उच्चारणाच्या आणि विशिष्ट अक्षरसंख्येचा गट म्हणजेच 'चरणक' यांच्या संमिश्र जुळणीतून हा तयार झालेला आहे. हा पाच आणि सहा अक्षरांच्या स्वैर जुळणीने सिद्ध होणारा 'प्रेमजीवन' छांदस मुक्तछंद आहे. (अनिल, 'प्रेमजीवन', ''पेर्ते व्हा'', पृ० ४०)

दोन दिवस/उलटून गेले/
दोन रात्री/तशा संपून गेल्या/
अजून परी/विषण्णताच/मनास खोल /व्यापूनि आहे/
हालत्या जली/साउली जेवी/दूरच्या ढगांची /दडूनि राहे/

(२) मात्रिक मुक्तछंद :

अक्षरोच्चारणातील लघुगुरुभेद, म्हणजेच त्यांच्या उच्चारणाचे मात्रिक अधिष्ठान, कायम ठेवूनही ठरावीक मात्रावृत्त न वापरता, विविध मात्रिक आवर्तनांच्या सैल, स्वैर, खंडित बांधणीने तयार झालेला हा मात्रिक मुक्तछंद आहे.

मात्रिक मुक्तछंदाचे उदाहरण बघू. (पु०शि० रेगे, 'आठवण', ''साधना आणि इतर कविता'', पृ० १४)





अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| मनची माया | प |
| उमटली मुखावरती | ५ मात्रा/प |
| नयन बोलती | प |
| अधर हांसती- | प |
| मुग्ध-मधुर हे तव | प/२ मात्रा |
| हावभाव | भृ |
| जातील मग कां वाया? | प/४ मात्रा |

(३) गद्योच्चारी मुक्तछंद :

पूर्णोच्चारी वा स्पष्टोच्चारी विशिष्ट संख्येच्या अक्षरांच्या चरणांच्या पुनरावृत्तीने तयार होणाऱ्या समकालिक लयातून गद्योच्चारी छंद तयार होतो. अशाप्रकारच्या छंदातील अक्षरसंख्या प्रतिचरणी कमीजास्त होते, तेव्हा लयीत नियमिततेऐवजी विभ्रम तयार होतो व अशा छंदास 'गद्योच्चारी मुक्तछंद' म्हटले जाते. याचे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे. (अनिल, 'मानवता', ''पेर्ते व्हा'', पृ० ८४)

| | |
|---|---|
| अन्याय घडो कोठेही | ३/ २ /३ अक्षरे |
| चिडून उठू आम्ही | ३/२ /२ अक्षरे |
| घाव पडो कोठेही | २/ २ / ३ अक्षरे |
| तडफडू आम्ही | ३/ २ अक्षरे |
| हाल पाहून हळहळू | २/३/३ |
| होवोत कोठेही | ३ / ३ |

(४) मुक्तशैली :

अक्षरोच्चारणाच्या कालिक परिमाणावर आधारलेल्या लयबद्धतेऐवजी, शब्दोच्चारणातील आरोहावरोह, आंदोलन, साघातता यांमुळे निर्माण होणाऱ्या लयबद्धतेवर आधारलेली गद्य-पद्याच्या सीमारेषेवर असणारी शैली म्हणजे ''मुक्तशैली'' होय.

मराठी मुक्तशैलीचे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे. (पु०शि० रेगे. 'मला काय हवे आहे.', ''दोला'', पृ० ११६)

मला काय हवे आहे.
जीवन पाण्यासारखे प्रवाही व्हायला हवे
ठायी ठायी,
कानाकोपऱ्यात,
अगदी अंतरंगात
खालच्या थरापर्यंत जाऊन, ते पोचले पाहिजे
हा हव्यास, हा विनय, हा अनुनय, मला हवा आहे.





अनुक्रमणिका

आधुनिक मराठी छंद-विचार हा असा मुक्तछंदाच्या विविध पर्यायांना, प्रकारांना सामावून घेत, छंद:शास्त्रात भर टाकीत विकसित होत चाललेला आहे. आपल्या मनोगत आशयाला अनुकूल अशा घाटाची म्हणजेच छंदाची निवड कविमनाकडून आपोआप होत असल्याने छंदाचे त्याच्या घाटाशी असलेले अभिन्न नातेही अभ्यासले जात आहे. वरकरणी तांत्रिक वाटणाऱ्या छंदाचे आशयाशी असणारे सेंद्रिय नातेही आवर्जून लक्षात घेतले जात आहे. लयोद्भवी छंदाचे भावाशयानुसारी उद्भवणारे विविध आकृतिबंध मराठी छंदवैभवात भर टाकीत आहेत, मराठी काव्यप्रांतास समृद्ध करीत आहेत. थोडक्यात मराठी छंद-विचाराची वाटचाल योग्य रीतीने व योग्य दिशेने सुरू आहे.

(प्रस्तुत निबंध साहित्य अकादमी, दिल्ली व कला अकादमी, गोवा यांच्या संयुक्त विद्यमाने २९ व ३० ऑक्टोबर २०१३ रोजी गोव्यात आयोजित करण्यात आलेल्या ''भारतीय साहित्यातील छंदविचार'' या विषयावरील चर्चासत्रात वाचण्यात आला.)

**संदर्भ ग्रंथ :**


(१) छंदोरचना. डॉ० माधवराव पटवर्धन, कर्नाटक पब्लिकेशन हाऊस, मुंबई, प०आ० १९२७.

(२) छंदोरचना. डॉ० माधवराव पटवर्धन, कर्नाटक पब्लिकेशन हाऊस, मुंबई, दु०आ० १९३७.

(३) मराठी छंदोरचना : लयदृष्ट्या पुनर्विचार. डॉ० ना०ग० जोशी, बडोदे (स्वयंप्रकाशित प्रबंधग्रंथ) १९५५.

(४) मराठी छंदोरचनेचा विकास. डॉ० ना०ग० जोशी, मौज प्रकाशन, मुंबई, १९६४

(५) तुलनात्मक छंदोरचना, डॉ० ना०ग० जोशी, मौज प्रकाशन, मुंबई, १९६८

(६) मराठी मुक्तछंद. डॉ० शुभांगी पातुरकर, मंगेश प्रकाशन, नागपूर, १९९९

(७) छंद:शास्त्रीय समीक्षा. डॉ० शुभांगी पातुरकर, दिलीपराज प्रकाशन, पुणे, २००८


■

**स्वागत**

( १ ) 'स्वरमेघ संगीतिका' - सौ० सुलभा ठकार, प्रकाशक : डॉ० एस०एन० ठकार, पुणे. पृष्ठे : ९६, किंमत : ₹ १००/-

( २ ) 'मराठी भाषा आणि शुद्धलेखन - एक विचारमंथन' - सत्त्वशीला सामंत, प्रकाशक : डायमंड पब्लिकेशन्स, पुणे. पृष्ठे : २३७, किंमत : ₹ २७०/-

( ३ ) 'शब्द माझे सोबती' (कवितासंग्रह) - उमाकांत रामचंद्र कामत, प्रकाशक : प्रतिभा कामत, मुंबई. पृष्ठे : १२५, किंमत : ₹ १५०/-

# ‘मांझी’साठी नीरव आक्रोश

- हेमा क्षीरसागर

‘मांझी गाव’ हे एक लहानसं खेडं, पश्चिम बंगाल आणि सिक्कीम यांच्या सरहद्दीवरचं. कोळी लोकांचं गाव. ‘रंगीत’ हे त्या गावातल्या नदीचं नाव. होडीतून लोकांना नदीपार नेणं किंवा आणणं हा त्यांचा एक व्यवसाय आणि ‘मच्छिमारी’ हा दुसरा. ‘मांझी’ म्हणजे ‘नावाडी’. मांझी लोकांचा गाव तो ‘मांझी गाव’. पर्वतातून वेगानं वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहातून बोट वल्हवणं ही एक कला होती आणि ही कला फक्त ‘मांझी’ लोकांनाच अवगत होती. या लोकांची भाषा म्हणजे मांझी’ भाषा.

भारतात आजमितीला ७८० भाषा बोलल्या जातात. त्यांपैकी काही भाषा नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत. त्यांपैकी एक म्हणजे ‘मांझी’ ही भाषा. पर्वतीय भागातील नावाडी जमातीची मातृभाषा असलेली ही भाषा एके काळी वैभवशाली भाषा होती. पण आज मात्र तिची अवस्था दयनीय झाली आहे.

‘थक मांझी’ हा ‘मांझी गाव’मधला एक ८० वर्षांचा वृद्ध. ‘मांझी’ ही त्याची मातृभाषा. मातृभाषेवर त्याचं विलक्षण प्रेम. ‘मांझी गाव’च्या परिसरातील लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांना ‘थक’ आणि त्याचं ‘मांझी’ भाषेवरचं प्रेम माहीत आहे. ‘थक’ अलीकडं फारसं बोलत नाही. आपल्या जमातीत शिरकाव केलेल्या ‘हिंदी’ संस्कृतीमुळं तो पार खचून गेला आहे. लहानपणी आपल्या आईवडिलांकडून शिकलेली ‘मांझी’ भाषा तो हळूहळू विसरत चालला आहे. याचं कारण त्या भाषेवर होणारं हिंदी संस्कृतीचं अतिक्रमण! आपली भाषा हळूहळू नाहीशी होत चालली आहे याचं त्याला अतोनात दु:ख होतं. ही भाषा जाणणारा त्याच्याखेरीज आणखी एकच माणूस त्या गावात आहे. तो म्हणजे ईश्वरीप्रसाद. ‘मांझी गाव’मधे चार ‘मांझी’ कुटुंबं आहेत, त्यापैकी एका कुटुंबातला हा ‘ईश्वरीप्रसाद मांझी.’ आपली भाषा जिवंत ठेवण्यासाठी हा ईश्वरीप्रसाद प्राणपणानं झगडतोय. त्याचे दोन नातेवाईक ‘अनिल मांझी’ (वय वर्षं ५०) आणि शिशिर मांझी’ (वय वर्षं २९) हेही ‘मांझी’ भाषा बोलतात; पण ती तुटक तुटक! असं सांगतात की या भाषेला आपली स्वतंत्र लिपी होती, पण सुमारे १०० वर्षांपूर्वीच ती नाहीशी झाली.

आपल्या मातृभाषेसंबंधी बोलताना ‘थक’ सांगतो, “ ‘मांझी’ ही टेकड्यांमधे राहणाऱ्या कोळ्यांची भाषा होती. ही भाषा आणि हिंदी किंवा नेपाळी या भाषा यांमध्ये कधीच, काहीच जवळीक नव्हती. पण नेपाळी संस्कृतीचा प्रभाव जसजसा वाढायला





अनुक्रमणिका

लागला, तसतशी नव्या पिढीनं नेपाळी हीच भाषा आपली मातृभाषा म्हणून स्वीकारली. मलासुद्धा आता 'मांझी' भाषा फारशी आठवत नाही.''

'मांझी' जमातीच्या धार्मिक कृत्यांमधे पर्वत, झाडं, 'रंगीत' नदी यांचा अंतर्भाव आहे. यावरून ते निसर्गपूजक असावेत असं वाटतं. त्यांच्या धार्मिक सणांमधे 'रंगीत' नदीला विशेष महत्त्व असतं. या वेळी ते नदीच्या पात्रात जाऊन नदी-देवतेची पूजा व प्रार्थना करतात. अनिल व शिशिर या दोघांना ही 'मांझी' ही आपली मूळ भाषा टिकवून ठेवायची आहे. ती जिवंत राहावी यासाठी त्यांची धडपड सुरू आहे. शिशिर सांगतो, ''माझ्या आजोबांकडून मी 'मांझी' भाषेतले कितीतरी शब्द शिकलो. पण आज आजोबा हयात नाहीत. आमच्या गावातील काही वयस्कर लोकांकडूनही मी काही काही शब्द व कल्पना गोळा केल्या. ८० वर्षं वयाचा एक 'थक मांझी' सोडला तर 'मांझी' ही भाषा अवगत असणाऱ्या कोणीही वृद्ध व्यक्ती आता हयात नाहीत. या भाषेचं पुनरुज्जीवन करण्यासाठी एक नेपाळी गटही प्रयत्नशील आहे.''

'पर्वतीय जमात' अशी सरकारी कागदोपत्री आपली नोंद व्हावी अशी 'मांझी' लोकांची खूप इच्छा होती; पण ती पूर्ण झाली नाही. सिक्कीम सरकारनं 'अनुसूचित जमात' अशीच त्यांची नोंद केली आहे.

बडोदा येथील भाषा संशोधन आणि प्रकाशन केंद्राच्या भाषिक सर्वेक्षणात सिक्कीम या भागात काम केलेले प्रा० बाळाराम पांडे म्हणतात, '' 'मांझी' या भाषेबाबत आम्ही दीर्घकाळ काम करीत आहोत. शासनाला एक अहवालही आम्ही सादर केला आहे. आमचं काम अजूनही चालू आहे. मौखिक परंपरेनं चालत आलेल्या लोकगीतांच्या नोंदी करण्याचा प्रयत्नही सुरू आहे.''

'मांझी'चा अंत म्हणजे केवळ एका भाषेचा अंत नसून तो एका जीवनपद्धतीचा अंत आहे आणि तसा तो होऊ नये अशी त्यांची आत्यंतिक इच्छा आहे. त्यासाठी त्यांचे प्रयत्न चालू आहेत.

**आधार :**

( १ ) 'रेकॉर्डिंग मोअर दॅन मीअर वर्ड्ज', दिलीप पाडगावकर, 'दि टाइम्स ऑफ इंडिया' २४.८.२०१३

( २ ) 'इन सायलेन्स ऑफ ॲन 80 इअर ओल्ड', मधुपर्णा दास, 'इंडियन एक्स्प्रेस' ११.८.२०१३

■





अनुक्रमणिका

# मँडरिन - चीनची राष्ट्रीय भाषा

अनुवाद - अ०पां० देशपांडे

भारताच्या वेगवेगळ्या राज्यांत वेगवेगळ्या भाषा बोलल्या जातात. चीनमध्ये मात्र संपूर्ण देशात चिनी ही एकच भाषा बोलली जाते असा आपला समज आहे. पण चीनबद्दल फारच थोडी आणि तीही खरी अशी माहिती आपल्यापर्यंत येते. चीनमधील वेगवेगळ्या राज्यांत बोलली जाणारी भाषा चिनीच, पण ती इतकी वेगवेगळी असते की एकाची भाषा दुसऱ्याला समजत नाही. आपल्याकडेही एक निरीक्षण असे आहेच की प्रत्येक दहा कोसांवर (एक कोस = ३.२ किलोमीटर) भाषा बदलते. पण ही बदलणारी भाषा म्हणजे त्याचे हेल बदलतात आणि काही शब्द बदलतात. उदा० खानदेशात आईऐवजी त्यांना माय हा शब्द जवळचा वाटतो. आणि हे सगळ्याच देशांत असे होत असल्याने हा बदल बोली भाषेपुरता टिकून रहातो आणि सगळ्यांना समजावे म्हणून पाठ्यपुस्तकांतून प्रमाण भाषा शिकवली जाते. चीनमधील प्रमाणभाषेला मँडरिन किंवा पुटोन्गुआ असे म्हणतात. आणि ही प्रमाणभाषा चीनमध्ये सगळ्यांना यावी म्हणून तेथे ५० वर्षे प्रयत्न चालू आहेत. चीनमध्ये मँडरिन ह्या प्रमाणभाषेबरोबरच 'यू' ही कँटोनीमधील भाषा, 'वू' ही शांघायमध्ये बोलली जाणारी भाषा, 'मिनबेई' ही फुझोयूमध्ये बोलली जाणारी भाषा आणि 'होक्कीन' ही तैवानमध्ये बोलली जाणारी भाषा - या चार भाषांना प्रमाणभाषेचा दर्जा दिला गेला आहे. पण पाठ्यपुस्तकांतून मात्र मँडरिन भाषाच शिकवली जाते. या शिवाय भारताप्रमाणे तेथेही 'झियांग', 'हक्का' यांसारख्या अनेक बोली भाषा आहेत.

चीनमध्ये विविध जाती-जमातींचे लोक रहातात. पण तेथील एकूण लोकसंख्येपैकी ९० टक्के लोक 'हन' या जमातीचे आहेत. बाकीचे दहा टक्के लोक उरलेल्या ५५ जाती-जमातींचे आहेत. या सर्व जाती-जमातींच्या लोकांना अल्पसंख्यांकांचे स्थान आहे. हे अल्पसंख्यांक जरी देशभर विखुरलेले असले तरी त्यांचे प्राबल्य चीनच्या उत्तर, वायव्य आणि नैऋत्य सीमेजवळ आहेत. हक्का बोली बोलणारे लोक जरी कोणत्याही अल्पसंख्य जातींपैकी नसले तरी ते हन जाती-जमातीपेक्षा वेगळे आहेत. चीनच्या युनान राज्यात मात्र विविध अल्पसंख्यांक जाती-जमातींचे लोक मोठ्या प्रमाणावर रहातात. हे अल्पसंख्यांक लोक कोठेही राहात असले तरी ते त्या त्या ठिकाणी मात्र आपापल्या जातीच्या समूहाने एकत्र रहातात. त्यांना तसे एकत्र रहाण्यासाठी चीन देशातर्फे अल्पसंख्यांक आरक्षणाखाली वेगळी जागा दिली जाते.





अनुक्रमणिका

चिनी भाषा ही आपण संस्कृत किंवा इंग्रजी लिहितो तशी मुळाक्षरांनी लिहिली जात नाही. याबाबतीत चिनी भाषेचे साधर्म्य हे जपानी आणि कोरियन भाषेशी आहे. या फरकामुळेच चिनी भाषा आणि चिनी लोकांबद्दल खूप दंतकथा आहेत. चिनी भाषा ही भारतीय भाषांसारखी वर्णोच्चारदर्शक नाही. त्यामुळे आपणा भारतीयांना शिकायला ही भाषा अवघड आहे. बऱ्याच लोकांचा असा समज आहे, की चिनी भाषेच्या वेगळेपणामुळे ते लोकही आपल्यापेक्षा वेगळेपणाने विचार करतात. पण हे विधान खरे नसून भारतीयांना चिनी लोक समजावून घेणे अवघड नाही. चिनी आणि भारतीय समाज हा कुटुंबकेंद्रित आणि शेतीप्रधान आहे. आपण एकत्र कुटुंबात रहाणारे आहोत. दोन्ही देशातल्या सांस्कृतिक बंधांत खूपच सारखेपणा असून ते कुटुंबाभोवती फिरणारे आहेत. पश्चिमेकडील काही देशांना असे वाटते, की मँडरिनसारखी प्रमाणभाषा जनतेवर लादून चीनचे कम्युनिस्ट सरकार त्यांच्या देशातल्या बोली भाषांना मूठमाती देत आहे. पण हे खरे नाही. कारण चीनच्या विविध राज्यांत रहाणाऱ्या लोकांच्या रहाण्या-वागण्याच्या पद्धती आणि बोलणे वेगवेगळ्या प्रकारचे आहे. लोक आजही आपल्या संस्कृतीचे जतन करून आहेत आणि त्यांना त्याबद्दल अभिमान आहे, मग ती गंगडॉनची असो की हेननची, हुनानची की युनानची.

चिनी भाषा ही सायनो-तिबेटियन भाषाकुलातील आहे. जशी इंग्रजी आणि हिंदी ह्या इंडो-युरोपियन भाषाकुलातील आहेत. हे सायनो-तिबेटियन भाषाकुल ईशान्य भारतापासून ईशान्य चीनपर्यंत पसरले असून त्यात दक्षिण आणि पूर्व आशिया खंडातील १५० कोटी लोक रहातात. चिनी भाषा ही एकच भाषा नसून ते एक भाषाकुल आहे. पण त्या सगळ्या चिनी भाषांतील शब्दसंग्रह आणि व्याकरण समान आहे. चिनी भाषेत वर्णमाला नसल्याने ती बोलली जाते तशी लिहिली जात नाही. चिनी मुळाक्षरे ही इंग्रजीतील ए, ई, आय, ओ व यू ह्या अक्षर-समुच्चयाचा उपयोग करून बनवली आहेत. त्यामुळे चिनी भाषेतील उच्चार कठीण जातात. खरे म्हणजे सर्व भारतीय लोकांना हिंदी येते; त्यामुळे त्यासाठी वापरल्या जाणाऱ्या देवनागरी लिपीचा वापर करून चिनी भाषा शिकणे अवघड नाही. कारण त्यात आपण दहा स्वर वापरतो. चिनी भाषेत मजकूर एकच असला तरी वेगवेगळ्या राज्यांतील उच्चार वेगवेगळे असल्याने एकमेकांना ते समजू शकत नाहीत; पण लिखित मजकूर मात्र सगळ्यांना वाचता येतो. कारण तो सगळा एकाच पद्धतीने लिहिलेला असतो. थोडक्यात लिखित भाषा एकच पण उच्चार वेगवेगळे.

चिनी भाषा ही चित्रदर्शी आहे. सगळेचजण लिखाण करू लागल्याने लिखाणाची ढब एकसारखी होत गेली आणि त्यातील चित्राचा भाग कमी होत गेला. काही जटील वर्णांच्या मात्रा, काने किंवा फटकारे कमी करून ते शिकण्यासाठी व वाचन, लिखाणासाठी सुलभ करण्यात आले. त्यामुळे आता चिनी मुळाक्षरे प्रमाणित तर झालीच आहेत; पण

उच्चार सुलभही झाली आहेत. लिपीची मुळाक्षरे ही आता नुसतीच चित्रे राहिली नसून ती आता उच्चारही सुचवतात. एवढेच नव्हे तर काही वेळा ते शब्दार्थही सुचवतात. जसे - ह्युमन, मेकॅनिकल, लिक्विड, इन्सेक्ट इत्यादी.

१९५०च्या दशकात चीनच्या कम्युनिस्ट सरकारने भाषा सुलभ करण्याचे महत्त्वाचे पाऊल उचलले. त्याच वेळी त्यांनी साक्षरतेची मोहीम राबवली आणि मँडरिन भाषेला राष्ट्रीय भाषेचा दर्जा दिला. ह्या एका गोष्टीचा आज चीनला फार मोठा फायदा झाला आहे. १९५० साली चीनमध्ये साक्षरतेचे प्रमाण २५ टक्के होते ते १९९०च्या दशकात ९८ टक्के झाले. चीनमधील प्रत्येक व्यक्ती आता मँडरिन भाषा लिहू आणि वाचू शकते, म्हणजेच या भाषेत छापलेल्या कोणत्याही पुस्तकाचे १३० कोटी ग्राहक असू शकतात. त्यामुळेच गेल्या दोन दशकांत चिनी पुस्तकांची बाजारपेठ विलक्षण फोफावली आहे. बऱ्याचशा दर्जेदार पाश्चिमात्य आणि भारतीय पुस्तकांची भाषांतरे चिनी भाषेत होतात. जगातल्या सर्व प्रकारच्या विज्ञानविषयक मासिकांचे चिनी भाषेतील अंक ताबडतोबीने स्टॉलवर विक्रीला उपलब्ध असतात. रामायण, महाभारत, जे० कृष्णमूर्तींचे विचार, डॉ० द्वारकानाथ कोटणिसांचे चरित्र इत्यादी अनेक ग्रंथ आता चिनी भाषेत मिळतात. चीनमधील कोणत्याही मोठ्या शहरातील प्रचंड मोठ्या मॉल्समध्ये पुस्तकांची बहुमजली दुकाने असतात आणि त्यात अक्षरशः चिनी भाषेतील लाखो पुस्तके विक्रीला ठेवलेली असतात. ह्या दुकानांत ग्राहकांची मोठीच गर्दी उसळलेली असते. अत्यंत अवघड लिपी असलेल्या चिनी भाषेने मारलेली ही फार मोठी मजल आहे. मँडरिन ही आता जगात सर्वदूर पसरलेली भाषा आहे.

'पीपल्स रिपब्लिक ऑफ चायना'ने आता 'पिन्यिन' या नावाची मँडरिनसाठी रोमन मुळाक्षरे असलेली प्रमाणभाषा विकसित केली आहे. पण काही लोकांचे असे निरीक्षण आहे, की पिन्यिनमध्ये केलेले उच्चार हे मँडरिनमधील उच्चारापेक्षा थोडे वेगळे वाटतात. पण तरीही एक गोष्ट खरी की पिन्यिनचा वापर आता खूप वाढला आहे. (आपल्याकडेही भ्रमणध्वनीवर एसएमएस करताना लोक मराठीतला निरोप रोमन लिपीत पाठवतात आणि परप्रांतीय लोक त्याचा हवा तसा उच्चार करतात तसे) उदा० पिन्यिनमध्ये माओ-त्सेतुंगचा उच्चार माओ-झेडाँग आणि चाऊ-एनलायचा उच्चार झाऊ-एनलाय असा करतात. पिन्यिन ही रोमन लिपीत चिनी भाषा लिहायची एकमेव पद्धत नसली तरी तीच आता सर्वदूर पसरली आहे. पिन्यिनमधील शब्दांचे उच्चार हे इंग्रजीलाही मान्य नसलेले असेच आहेत. त्यामुळे पिन्यिन लिपीतील उच्चार धड मँडरिनचे नाहीत की धड इंग्रजीचे नाहीत. अधलेमधलेच आहेत. शिवाय ते उच्चार परदेशी माणसाच्या संदर्भात सुलभही नाहीत. उदाहरणार्थ सी, क्यू, एक्स, झेड आणि सीएच ह्यांचे उच्चार टीएस, सीएच, एसएच, डीएक्स आणि जे या शब्दांसारखे असतात. भारतीय लोकांना देवनागरी लिपी वापरून



अनुक्रमणिका

मँडरिनमधील उच्चार बरोबर शिकता येतात. एकदा मँडरिन भाषा आली म्हणजे चीनच्या कोणत्याही भागात आपण गेल्यावर तेथील लोकांचे बोलणे आपल्याला समजेल अशा भ्रमात मात्र कोणी राहू नये. कारण तेथील लोकांचे उच्चार आपल्याला समजता समजत नाहीत. बऱ्याचशा वृद्धांना मँडरिन समजत नसल्याने ते तिच्या वाटेला जात नाहीत.

**चीनमधील संदेशवहन**

चिनी भाषा ही आपल्याला लिखाण आणि उच्चारण या बाबतीत संपूर्ण वेगळी तर वाटतेच; पण ते जे बोलतात ते पाश्चिमात्यांपेक्षा खूपच वेगळे वाटते. ते बोलताना ऊनोक्ती वापरतात. किंवा अप्रत्यक्ष पद्धतीने बोलतात. ते 'ग्रेट', 'टेरिफिक', 'फँटॅस्टिक'सारखे शब्द क्वचितच वापरतात. त्यासाठी ते वास्तविकापेक्षा कमी, दुहेरी नकारात्मक, (उदा० सरळ 'होय' म्हणण्याऐवजी 'नाही असे नाही') सकृतदर्शनी मोघम वाटेल असे किंवा संदिग्ध, प्रखर किंवा कटू शब्द वापरण्याऐवजी सौम्य शब्द आणि मोहक शब्द वापरतात. व्यावसायिक चर्चेच्या वेळी एखाद्या प्रकल्पाविषयी बोलताना 'वेंटी बुडा' म्हणजे 'या समस्या काही फार कठीण नाहीत' असे ते म्हणतात. पण त्यांनाच का दोष द्या? अशा प्रकारच्या व्यावसायिक चर्चेत मुरलेले जाणते भारतीय लोकही असेच बोलतात. एखाद्या गोष्टीला नकार द्यायचा असेल तर चिनी लोक, कदाचित हे सोयीचे नाही किंवा सध्या यासाठी योग्य वेळ नाही असे म्हणून मोकळे होतात. तसेच टीका करायची झाली तरी ते ती सौम्य शब्दांतच करतात; पण तीही खूप परिणामकारक असते. असे अप्रत्यक्ष बोलणे किंवा मोह पडावा असे बोलणे हा तर त्यांच्या प्राचीन संस्कृतीचाच भाग आहे. तसा तो प्राचीन भारतीय संस्कृतीतही दिसतो. चीनमधील राजकीय नेते मंडळीही प्रादेशिक भाषेतूनच बोलतात; कारण त्यांना लोकांशी जवळीक साधायची असते. पाश्चिमात्य देशात जसे एकाच प्रकारची कायद्याची भाषा कागदोपत्री वापरतात तशी भाषा पाहून चिनी, जपानी आणि भारतीय लोक बावचळतात. कारण त्या भाषेचा देशी भाषेशी संबंध नसतो. ब्रिटिश लोकांनीच अशी भाषा भारतात आणली. अशा भाषेमुळे सामान्य लोकांची दिशाभूल होते. ही भाषा सामान्य जनतेला मुळीच समजत नाही. सामान्यपणे हे लोकांना माहीत नाही की चीन आणि जपानमध्ये भारत आणि अमेरिकेपेक्षा वकिलांची संख्या कमी आहे.

आशिया खंडातील व्यापार-उदीम हा परस्परसंबंध, पैसे, मालाची देवाण-घेवाण आणि सेवा या गोष्टींवर अधिक अवलंबून आहे. कायद्याच्या भाषेत बनवलेली कागदपत्रे तयार करण्याच्या भानगडीत हे लोक पडत नाहीत. गावातली नेते मंडळी एकत्र बसून दोन्ही बाजूच्या लोकांची गाऱ्हाणी ऐकून घेतात आणि सारासार विवेक वापरून तंटे सोडवतात. फसवाफसवीच्या आरोपावरून चीन आणि भारताच्या ग्रामीण भागात

जातीबाह्य केले जाण्याची शिक्षा अजूनही सगळ्यात कडक अशी मानली जाते. याबाबतीत चीनचा १९७९ सालचा सामायिक जोखमीचा कायदा अभ्यसनीय आहे. या कायद्यात मार्गदर्शक तत्त्वे सांगितली जातात; पण आणखी खटला कसा चालवायचा आणि त्यासाठी शिक्षेची तरतूद काय केली आहे हे काही सांगितले जात नाही. भाषेच्या या मोघमपणामुळे आपली गुंतवणूक वाया जाऊ नये म्हणून कोणीही धंद्यातून माघार घेत नाही. खरा प्रश्न आहे तो भाषेचा नसून चीनमध्ये जी व्यावसायिक संस्कृती आहे ती महत्त्वाची आहे.

(श्री० प्रभाकर देवधर यांच्या 'सिनास्थान टुडे - व्ह्युइंग चायना फ्रॉम इंडिया' या पुस्तकातून)

■

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' (भाषा आणि जीवन) या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन :

(१) **प्रकाशन-स्थळ :** पुणे, महाराष्ट्र
(२) **प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक :** हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै), दिवाळी (ऑक्टोबर).
(३) **प्रकाशक व मुद्रकाचे नाव, पत्ता :** आनन्द काटीकर, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद. बी 5/16, सनसिटी, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.
**राष्ट्रीयत्व :** भारतीय.
(४) **मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.
(५) **संपादकाचे नाव, पत्ता :** प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
**राष्ट्रीयत्व :** भारतीय.

मी, आनन्द काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

-**आनन्द काटीकर** कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद





अनुक्रमणिका

# निसर्गानुभवावर आधारलेल्या म्हणी

- विद्या प्रभुदेसाई

माणसाच्या शारीरिक संवर्धनासाठी ज्याप्रमाणे जल आणि अन्नाची गरज असते त्याचप्रमाणे सुस्थिर, प्रगत, वैभवपूर्ण आणि चारित्र्यसंपन्न अशा व्यक्तिमत्त्वाच्या पूर्णतेसाठी तत्त्वांची आवश्यकता असते. जीवनातील अनुभवाच्या प्रयोगशाळेत ती बुजुर्गांना सापडलेली जीवनमूल्ये असतात. चार भिंतींच्या आंत बसून घेतलेल्या मूल्यशिक्षण वा पर्यावरण-ज्ञानापेक्षा त्यांची प्रत निश्चितच वेगळी असते.

लेखनपूर्व काळात माणसाने आपले अनुभव केवळ मौखिक परंपरेनेच जतन करून ठेवले होते. आपल्याला आलेले जीवनविषयक अनुभव सूत्ररूपात मांडून ठेवल्यामुळेच ती सूत्रे शतकानुशतके मार्गदर्शन करीत आली. ही जीवनसूत्रे म्हणजे मानवाचा एक अनुभवकोशच आहे असे म्हणता येते. भाषेतील सुभाषिते, म्हणी, वाक्प्रचारांचा साठा यांमधून माणसाला आलेले अनुभव आणि त्या अनुभवांच्या आधारे त्याने मांडलेले जीवनसिद्धांत आले आहेत. विवेक, विनोद, कल्पकता या गुणांनी परिपूर्ण अशा या भाषिक संचितावर ऐतिहासिक, सामाजिक वा राजकीय परिवर्तनाचा फारसा परिणाम झालेला नाही. स्थलकालाच्या पलीकडे घेऊन जाणारी, सार्वत्रिक सत्ये सांगणारी ही भाषिक रत्ने मानवी जीवन संस्कारसंपन्न बनविण्यात यशस्वी झाली आहेत.

निसर्गाच्या रूपात माणसाने जसा देव पाहिला तसाच आदर्श गुरुही पाहिला. युगानुयुगे निसर्गाबरोबर चालताना त्याने निसर्गाचे मूड पाहिले, सांभाळले आणि त्यानुसार आपली जीवनशैली निश्चित केली. निसर्गाबरोबर चालताना त्याला आलेले निसर्गाचे अनुभव त्याने आपली मार्गदर्शक तत्त्वे म्हणून स्वीकारली. आज विज्ञानाचा आधार घेऊन जर या निसर्गरूपांचा अभ्यास केला तर मानवी अनुभव किती अर्थपूर्ण आणि सूचक होते हे लक्षात येते.

भाषेतील म्हणी-वाक्प्रचारांमधून माणसाने टिपलेल्या निसर्गातील वैशिष्ट्यांचा त्याने मानवी जीवनाशी जोडलेला संबंधही वैशिष्ट्यपूर्ण आहे. काही निवडक म्हणी-वाक्प्रचारांच्या माध्यमातून हा संबंध तपासता येतो.

**पी हळद हो गोरी :** हळद अंगाला लावल्यानंतर रंग गोरा होतो. पण त्यासाठी काही काळ जावा लागतो. लवकर गोरे होण्यासाठी हळद प्यायली तरी तिचा काही परिणाम होणार नाही. (एखादा माणूस परिणामासाठी उतावळासारखा वागू लागल्यास ही म्हण

वापरली जाते.)

**अर्ध्या हळकुंडाने पिवळे होणे :** या वाक्प्रचारातही हळदीच्या गुणधर्माचा संदर्भ आहे. थोड्याशा यशाने हुरळून जाणे.

(**हळद** ही वनस्पती औषधी असून तिचा उपयोग जंतुनाशक म्हणून तसेच सौंदर्यप्रसाधनासाठी केला जातो. हळदीतील हे गुणधर्म प्रयोगशाळेत तपासण्यापूर्वीपासून भाषेत वापरल्या जाणाऱ्या म्हणी तसेच वाक्प्रचारांमध्ये आले आहेत.)

**नाकाला मिर्च्या झोंबणे :** चरफडणे : एखादी गोष्ट जिव्हारी लागल्याने रागाने प्रतिक्रिया व्यक्त करणे.

**मिर्च्यांची धुरी दिल्याशिवाय नाग बिळाबाहेर येत नाही :** कडक उपाय केल्याशिवाय गुन्हेगार गुन्ह्याची कबुली देत नाही.

(मिर्ची ही तिखट असून तिचा तिखटपणा झोंबरा असतो. नागासारखा अतिविषारी प्राणी सुद्धा हा तिखटपणा सहन करू शकत नाही. हा तिखटपणा जर नाकाला झोंबला तर माणूस बेशुद्धसुद्धा होऊ शकतो. बिळात लपून बसलेल्या सापाला बाहेर काढण्यासाठी बाहेरून मिर्च्यांना आग लावून धूर बिळात सोडला जातो.)

**डोक्यावर मिरी वाटणे :** अनपेक्षित गोष्ट करून धक्का देणे.

(मिरी हे वेलीवर होणारे फळ असून अत्यंत गुणकारी आहे. अर्धांगवायूचा झटका आलेल्या माणसाला संपूर्ण अंगभर वाटलेल्या मिरीचा लेप लावण्याची पद्धत आहे. एखाद्याला आकस्मिक धक्का देणारे वा विपरीत असे कृत्य जर कोणी केले तर समोरचा माणूस थक्क म्हणजे गार होतो. असे धक्का देणारे कृत्य कोणी केले तर चांगली डोक्यावर मिरी वाटली असे म्हटले जाते.)

**ज्याच्या पोटात दुखेल तो ओवा मागेल :** संकटात असलेला माणूस संकटातून बाहेर पडण्याचा मार्ग शोधतो.

(ओवा ही औषधी वनस्पती असून ती वाताहारी अशा गुणधर्मांनी युक्त असते. गारठ्यामुळे पोटात दुखल्यास ओवा खातात. बाळंतिणीच्या जेवणात ओवा वापरण्याची पारंपरिक प्रथा आहे. संकटग्रस्त अथवा दु:खग्रस्त माणूस त्यातून पार पडण्याचे उपाय शोधतो हे ही म्हण सांगते.)

**सुंठीवाचून खोकला गेला :** उपाय न करताच संकट दूर होणे.

(सूंठ ही त्रिदोषहारी आहे असे आयुर्वेदात सांगितले आहे. वात, कफ आणि पित्तहारी असे हे मूळ असून चवीला अत्यंत तिखट असते. सुंठीची पावडर मधात मिसळून चाटल्यास खोकला कमी होतो. उपाय न करता जेव्हा कोणतेही काम होते तेव्हा ही म्हण वापरली जाते.)

**राजा उदार झाला आणि भोपळा दान केला :** एखाद्या मोठ्या व्यक्तीने क्षुल्लक

गोष्टीचे दान करणे.

(भोपळा हे फळ वेलीवर होते. ते आकाराने मोठे असून फार पौष्टिक अथवा रुचकरही नसते. आकाराच्या मानाने अत्यंत स्वस्त असलेला भोपळा केवळ खाण्यासाठी वापरतात. एखाद्या श्रेष्ठ माणसाने हलक्या प्रतीचे दान केल्यास ही म्हण वापरली जाते.)

**आवळा देऊन कोहळा काढणे :** स्वल्प मोबदल्यात अधिक फळ घेणे.

(आवळा आणि कोहळा ही दोन्ही फळे अत्यंत औषधी आहेत. परंतु आवळा हा आकाराने फार लहान असून त्या मानाने कोहळा फार मोठा असतो. एखाद्याने कमी देऊन जास्त घेतल्यास ही म्हण वापरली जाते.)

**कडू कारले तुपात तळले, साखरेत घोळले तरी कडू ते कडूच! :** कोणत्याही उपायांनी वृत्तीत बदल होत नाही.

(कारले ही वेलीवर येणारी फळभाजी असून चवीला अत्यंत कडू असते. मधुमेह्यांसाठी कारले हे औषधी मानले जाते. याचा कडवटपणा इतका असतो की त्यावर तूपसाखरेची प्रक्रिया करूनही त्याचा कडवटपणा जात नाही. एखाद्याच्या अंगी असलेले दुर्गुण जन्मत:च आहेत आणि त्यात संस्कारांनी काही बदल होत नाही असे दिसते तेव्हा या म्हणीचा वापर करतात.)

**आपल्या आळवाची खाज माहीत असणे :** आपल्या जवळील गोष्टीची अधिक माहिती आपल्याला असते.

(आळू ही वनस्पती प्रामुख्याने कोकणात दिसते. अत्यंत खाजणाऱ्या अशा या कंदाला येणारी पाने भाजीसाठी वापरतात. कंदाच्या खाजण्याची तीव्रता किती आहे हे अनुभवामुळे वापरणाऱ्याला माहीत असते. त्यामुळेच एखाद्याच्या स्वभावाची खोड माहीत असल्याचे सांगताना या म्हणीचा वापर केला जातो.)

**पोक्या फणसाला चीक फार :** अंगात गुण नसलेला गुणाचा पोकळ तोरा मिरवतो.

(कोकणच्या मेव्यात ज्या फळाचा समावेश केला जातो ते फळ म्हणजे फणस होय. आतून गोड गरे आणि आठळ्या असणाऱ्या या फळाला बाहेरून काटे असतात. ज्या फणसात गरे कमी असतात त्याला पाक (चीक) अधिक प्रमाणात असतो. याच अर्थाची दुसरी म्हण : उथळ पाण्याला खळखळाट फार.)

**पानवेलीच्या धर्माने शेवग्याला पाणी :** एकामुळे दुसऱ्याला फायदा मिळणे.

(पानवेल आणि शेवगा : या दोनही वनस्पती असून पानवेल ही वेल आहे; तर शेवगा हे झाड आहे. शेवग्याच्या शेंगा आणि पाला भाजीसाठी वापरतात. त्यात भरपूर प्रमाणात कॅल्शियम असल्याने पूर्वी हाड मोडल्यास शेवग्याची साल बारीक वाटून त्याचा गरम लेप दिला जात असे. या झाडाला पाण्याची गरज नसते, त्यामुळे या झाडाला कोणी पाणी शिंपीत नाही. परंतु खाण्यासाठी जो विडा केला जातो त्याला लागणाऱ्या

पानांची वेल म्हणजे पानवेल ही अत्यंत नाजूक असून तिला सतत पाणीपुरवठा लागतो. ही वेल सहसा शेवग्याच्या झाडावर चढवली जाते. त्यामुळे साहजिकच पानवेलीला दिले जाणारे पाणी शेवग्याला आपोआपच मिळते. जेव्हा एकाच्या निमित्ताने दुसऱ्याला आपोआप फायदा होतो तेव्हा ही म्हण वापरली जाते.)

**पळसाला पाने तीनच :** सर्व ठिकाणी सारखीच परिस्थिती असणे.

**अंगाऱ्याला गेला आणि पांगारा घेऊन आला :** आवश्यक काम करण्यासाठी गेलेल्याने अनावश्यक काम करून येणे.

(पांगारा ही वनस्पती रानात असते. काटेरी खोड असलेली ही वनस्पती आतून पोकळ असल्यामुळे तिचा उपयोग लाकूडकामासाठी होत नाही. काही निरुपयोगी वनस्पतींमध्ये पांगाऱ्याची गणना केली जाते. जेव्हा विशिष्ट कामासाठी गेलेला माणूस निरुपयोगी काम करून येतो तेव्हा या म्हणीचा वापर केला जातो.)

**उंच वाढला एरंड तरी षंढ तो षंढ :** वय वाढले, तरी तशी वागणूक नसणे.

**एरंडाचे गुऱ्हाळ :** केलेल्या कामाचा काहीही उपयोग नसणे.

**ओसाड रानात एरंड बळी :** जिथे काहीच मिळत नाही तिथे जे मिळेल ते घेणे.

(एरंड या वनस्पतीचा फुले, फळे वा लाकूडकामासाठी उपयोग होत नाही. ही वनस्पती वनस्पती-जगतात निकृष्ट मानली गेली आहे. त्यामुळे निरुपयोगी गोष्टीचा संदर्भ एरंडाच्या दाखल्याने दिला जातो.)

**उंबराचे फूल :** अतिशय दुर्मीळ गोष्ट.

**भरल्या पोटी उंबर कड :** सुखाची अतिरिक्तता माणसाला बोचू लागते.

(उंबर हा अत्यंत औषधी वृक्ष असून त्याचे फूल दुर्मीळ असते. त्याचे फळ अत्यंत गोड आणि चविष्ट असते. फळातच त्याचे छोटे फूल असते. त्यामुळे ते कुणाला सहज दिसत नाही. उंबराच्या या गुणधर्मांचा संदर्भ या म्हणीत आहे.)

भाषेतील अश्या म्हणी व वाक्प्रचारांचे अवलोकन केल्यास निसर्गाच्या दाखल्यातून बळकट अनुभव व्यक्त झाल्याची अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. भाषेतील शब्द अशा अनुभवातून वाच्यार्थापलीकडील अर्थ घेऊन येतात. सुपारी देणे, सुपारी ठेवणे, गणेशपूजेला कुजका नारळ निपजणे, अशा वाक्प्रचारांबरोबरच 'कोल्हा काकडीला राजी', 'कोल्ह्याला द्राक्षे आंबट', अशा काही म्हणींमधून माणसाने निसर्ग आणि पर्यावरणाच्या माध्यमातून मानवी स्वभाववैशिष्ट्ये टिपण्याचा प्रयत्न केला आहे. आज पर्यावरण शिक्षण, पर्यावरण कायदे आले असले तरी आपल्या परंपरेने पर्यावरणाचे रक्षण आणि संवर्धन भावनिक पातळीवरून केले, निसर्गावर प्रेम केले, निसर्गाचा आदर राखला आणि निसर्गाचा सन्मान केला. यासाठीच निसर्ग-पूजनावर आधारित सण-उत्सव सुरू केले. निसर्गाशी केलेल्या मैत्रीतूनच त्याला निसर्गाचे गुणदोष दिसले. या गुणदोषांचा आधार घेऊन त्याने





अनुक्रमणिका

आपल्या आणि आपल्या पुढील पिढ्यांसाठी मार्गदर्शक सूत्रे मांडली. ही सूत्रेच मानवी जीवनाला संस्कारसंपन्न बनविण्यास उपयुक्त ठरतात. जागतिकीकरणाच्या रेट्यात अडकलेल्या माणसाने पुन: एकदा अशा स्व-भाषिक संस्कारांकडे वळून बघण्याची गरज आहे.

संदर्भ ग्रंथ :


( १ ) आपटे, वासुदेव गोविंद. मराठी भाषेचे वाक्संप्रदाय व म्हणी, तृ० आ०, गोपाळ जोशी, पुणे, १९४२.

( २ ) जैन, डॉ० सुधांशुकुमार. औषधी वनस्पती, द्वि० आ०, नॅशनल बुक ट्रस्ट, नवी दिल्ली, १९९६.

( ३ ) पराडकर, (डॉ०) मो०दि०. सूक्ती, सुभाषिते आणि सुविचार, द्वि० आ०, रोहन प्रकाशन, पुणे, १९९३.


■

## अभिनंदन

( १ ) परिषदेचे कार्यवाह, श्री० आनन्द काटीकर यांच्या प्रबंधाला पीएच्०डी० पदवीसाठी २४ एप्रिल २०१४ रोजी पुणे विद्यापीठाने मान्यता दिली. त्यांच्या प्रबंधाचा विषय 'भाषा आणि जीवन : एक अभ्यास' असा होता. त्यांना डॉ० मृणालिनी शहा यांनी मार्गदर्शन केले. 'डॉक्टर' आनन्द काटीकर यांचे मन:पूर्वक अभिनंदन!

( २ ) परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य, डॉ० प्रमोद तलगेरी यांना नुकताच कोलकाता येथे मर्क-टागोर पुरस्कार (₹ पाच लाख) देण्यात आला. हा पुरस्कार भारत आणि जर्मनी यांच्यामधील सांस्कृतिक संबंध दृढ करण्याच्या कामगिरीचा गौरव करण्यासाठी ई-मर्क या सुप्रसिद्ध औषधनिर्मिती करणाऱ्या जर्मन कंपनीतर्फे दिला जातो. कंपनीची स्थापना १६६८मध्ये (शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकानंतर दोन वर्षांनी) झाली. पहिल्या महायुद्धामध्ये पराभूत जर्मनीला टागोरांचे साहित्य उपचारासारखे वाटले. ई-मर्कच्या मालकीणबाईंच्या पतिराजांनी ते साहित्य जर्मन भाषेत प्रकाशित केले. त्यात त्यांना खूप नफा झाला. त्यांच्या वंशजाने २०१२मध्ये या पारितोषिकाची स्थापना केली. पारितोषिक दर दोन वर्षांनी दिले जाते.

ज्याची त्याची प्रचीती

# 'मारणे'- एक अनेकार्थी (नव) क्रियापद

- नेहा सावंत

**प्रसंग - १**

लेक्चर संपवून वर्गातून बाहेर आले. प्राचार्यांच्या कार्यालयाबाहेर गर्दी होती, प्राचार्यांचा रागाचा पारा अन् आवाजाचा वाढलेला पारा बाहेरही जाणवत होता. मस्टरवर सही करण्याच्या निमित्ताने केबिनमध्ये शिरले अन् आतल्या परिस्थितीचा अंदाज घेतला तेव्हा कळलं. म्हणजे कळलेल्या प्रसंगापेक्षा माझ्या भाषासृष्टीत नवी भर पडल्याचं मला जाणवलं. घडलं ते असं होतं, की एका विद्यार्थिनीने एका मुलाला SMS पाठवून आपल्या प्रेमाची कबुली दिली होती. हे सांगताना तो विद्यार्थी प्राचार्यांना म्हणत होता -

''सर, मी काय पण नाय केलं. हीच मला घडी घडी SMS मारत असते. तिनेच मला SMS करून 'प्रपोजल मारला.'' प्राचार्य एका नव्या भाषाविश्वात अन् भावविश्वात शिरत होते हे त्यांच्या चेहऱ्यावरून कळत होतं. तरीही ते त्याची 'शिकवणी' घेत होते. मला ही नवे भाषाभान, भाषाज्ञान लाभले होते.

आजपर्यंत नव्या तांत्रिक प्रगतीमुळे झालेल्या 'ई-भाषे'मुळे SMS करतात, फोन, करतात, कॉल करतात. हे ठाऊक होतं; पण SMS 'मारतात', कॉल 'मारतात' अन् प्रपोज करण्याऐवजी 'प्रपोजल मारतात.' हे काहीतरी नवीनच कळत होतं.

**प्रसंग - २**

प्लॅटफॉर्मवरच्या गर्दीतून कशीबशी बाहेर पडले. सकाळची वेळ म्हणजे नोकरदार, ऑफीसला जाणारे, शाळा-कॉलेजला जाणारे सगळ्यांचीच वर्दळ. विशेषत: या गर्दीतून बाहेर पडणारे बहुतेक जण प्लॅटफॉर्मबाहेरच्या चहाच्या टपरीवर गोळा होतात. त्या टपरीवर जाण्यासाठी काही मुलं चालली होती. त्यांचा कानावर पडलेला संवाद -

''च्यायला सकाळी चा प्यायला टाईमच नाय भेटला. आता पैला चा 'मारतो' मग कामाला जातो.''

''भेंडी गरम काय होते आनी तू चा मारतो? मी लिंबू सरबत 'मारतो' तू चाय मार जा.''

''आपन तर शिग्रेट 'मारनार'- एक झुरका 'मारला' का बास् एनर्जी फुल्ल. आपल्याला तुमचा चा बी नको, का लिंबू शरबत बी नको.''

वरील तीनही संवादात 'पिणे' आणि 'ओढणे' या क्रियापदांऐवजी 'मारणे' हे क्रियापद कोणत्याच अर्थी आणि का? योजले हे मात्र माझ्या बुद्धीपलीकडचे होते. त्यातला

भाव मात्र सगळ्यांपर्यंत पोहचला होता. तो शब्दशः 'मारणे' या कृतीशी नव्हता तर 'आस्वाद' प्रक्रियेशी निगडित होता.

**प्रसंग - ३**

भाजी मार्केटमधून भाज्या घेत चालले होते. दोन भाजीवाल्या बायका आपापसात भांडत होत्या. भांडणाचा मूळ विषय भाजी विकण्यासाठी बसायची जागा एकमेकींनी बळकावली असा काहीतरी होता. पण मूळ विषय कोसो दूर राहिला होता अन् भांडण भलतीकडेच वळलं होतं. अर्वाच्य अन् ग्राम्य शब्दांत हेटाळणी करताना एकमेकींच्या स्त्रीत्वाचा उद्धार अन् एकमेकींच्या लैंगिक अवयवांचा उद्धार करीत त्या यथेच्छपणे 'मारणे' या क्रियापदाचा वापरही करत होत्या अन् उद्धारही करत होत्या.

आजपर्यंत 'मारणे' हे क्रियापद कृतिदर्शक म्हणून मी ऐकले होते. विशेषतः काहीशी हिंसक कृती दर्शविणारे क्रियापद म्हणून मला परिचित होते. उदाहरणार्थ- चापटी मारणे, पट्टी मारणे, कानफटात मारणे, थोबाडात मारणे इत्यादी. हळूहळू माझ्या महाविद्यालयीन जीवनात आम्ही कॉलेजला दांडी 'मारली' किंवा लेक्चरला दांडी मारली असा शब्दप्रयोग करू लागलो. पण सध्या मुलं 'लेक्चर बंक 'मारतात', चहा, सरबत मारतात, सिगारेट मारतात, प्रपोज मारतात, SMS मारतात, मिस्कॉल मारतात. अशा प्रकारे 'मारणे' हे क्रियापद यथेच्छ कुठेही योजताना नव्हे 'मारताना' दिसतात.

एकंदरीत 'मारणे' हे क्रियापद अनेकार्थी पद्धतीने वापरून आपल्या माथी 'मारण्याचाच' प्रकार आहे असे म्हणणे वावगे ठरू नये. काही दिवसांनी 'जेवण मारतो', 'झोप मारतो', 'पेपर मारतो', 'परीक्षा मारली' असे शब्दप्रयोग ऐकण्याची तयारी ठेवावी लागेल. ■

## चुकीची दुरुस्ती

वर्ष ३२, अंक १, हिवाळा २०१४ या अंकातील काही चुकांची दुरुस्ती पुढीलप्रमाणे :

| पृष्ठ | ओळ | असे आहे | असे हवे |
|---|---|---|---|
| ३२ | २२ | कानाचा | कान्याचा |
| ४५ | ९ | पर | पण |
| ४५ | २४ | मिळावा | मिळाला |
| ४६ | १४ | अपेक्षा | उपेक्षा |
| ५९ | १८ | acode | abode |
| ५९ | १८ | cody | body |
| ६० | २ | उतर | इतर |
| ६४ | १६ | राजाराम | राजारामशास्त्री |

# दोन मातृभाषांचा समाज

- संजयकुमार कोळी

सीमा आणि भाषावादाच्या सांस्कृतिक संघर्षाची धार आजही सीमावर्ती भागात तीव्र असल्याचे आपण पाहतो. पण महाराष्ट्र व कर्नाटक राज्यांच्या सीमावर्ती भागातील दक्षिण सोलापूर, अक्कलकोट, मंगळवेढा, सांगली, कोल्हापूर आणि लातूर इ० जिल्ह्यातील बहुसंख्य लिंगायत, तेली, वाणी, इ० जाती आणि जमातींमधील लोक मात्र या संघर्षाला अपवाद ठरलेले आहेत. इथे भाषावादाला, संकुचित संस्कृतिवादाला सण, उत्सव, महोत्सव इ० संदर्भात कसलाच थारा दिला जात नाही. याउलट या भागात मराठी-कन्नड या दोन्ही भाषांना मातृभाषांचा समान दर्जा दिला जातो. या दोन्ही भाषा, येथे पूर्वापार बहिणी म्हणून नांदत आहेत.

बोली व संवादाची (व्यवहाराची) भाषा म्हणून दक्षिण सोलापूर तालुक्यात सर्रासपणे कन्नड भाषेचा वापर केला जातो. येथील प्रशासकीय व्यवहाराची भाषा मराठी आहे. विशेषतः बेळगाव, कोल्हापूर, निपाणी, सांगली, मिरज येथे हे भाग मराठी आणि कन्नड या भाषांमधील राजकीय व सांस्कृतिक संघर्षाच्या वणव्यात होरपळत आहेत. पण दक्षिण सोलापूर तालुक्यात कधीही भाषेचा दुराग्रही संघर्ष जाणवत नाही. भारताची भूमी ही समन्वयशील विचारांना पोषक आहे. प्राचीन काळात पंढरपूरमधील श्रीविठ्ठलाच्या रूपाने 'शैव व वैष्णव' या दोन्ही संप्रदायांना सामावून घेण्याचा संदेश या मातीने महाराष्ट्राला दिला आहे. जन्माला आलेलं प्रत्येक मूल दोन्ही भाषांच्या संस्कारात वाढते. त्याला शाळेत जाण्यापूर्वीच कन्नड आणि मराठी दोन्ही भाषांचा लळा लागलेला असतो.

येथील राजकीय धुरीण मराठी अथवा कन्नड भाषेचा दुराग्रह धरत नाहीत अथवा दुस्वासही करीत नाहीत. त्यामुळे महाजन समितीने दक्षिण सोलापूर तालुक्याचा कर्नाटक राज्यात समावेश करावा अशी शिफारस केली, तरीही या नाही तर त्या बाजूने कधीही संघर्ष उभा झाला नाही. काही शहरे बहुभाषिक असतात; परंतु ग्रामीण भाग असलेला तालुका द्विभाषिक असणे हा वेगळाच योग आहे. या दोन्ही राज्यांच्या सीमावर्ती भागात आजही रोटी-बेटी व्यवहार, व्यापार, सण-उत्सव मोठ्या आनंदाने साजरे केले जातात. विशेषतः कृषिजीवनाशी संबंधित असलेला कारुणी (कार-उणवी) म्हणजे खडतर आमावस होय. यालाच बहुसंख्य सीमावर्ती भागातील यळ्ळामाशी असेही म्हणतात. थोडक्यात येथे सांस्कृतिक आदान-प्रदान गुण्यागोविंदाने नांदते.

आई आपल्या मुलाशी ज्या भाषेतून प्रथमतः संवाद साधते, मूल प्रथम जी भाषा शिकते तिला आपण ढोबळपणाने मातृभाषा असे म्हणतो. परंतु या परिसरातील मातांना दोन्ही भाषाभगिनींचा लळा असल्याने त्या आपल्या मुलांशी दोन्ही भाषांतून संवाद साधताना दिसतात. दोन्ही भाषांचं बाळकडू या मुलांना आई-वडिलांकडून मिळते. मग ते आईवडील शिक्षित असोत वा अशिक्षित ! इथले लोकजीवन कधीच भाषेच्या संघर्षात गुरफटलेलं दिसत नाही. इतर सीमावर्ती भागात जसा भाषेवरून संघर्ष उभा ठाकलेला असतो, तसा संघर्ष वा भाषिक व्यवहाराची अडचण या भागातील लोकांना येत नाही. प्रशासकीय व्यवहाराची भाषा मराठी असली तरीही कार्यालयात काम करणारे कर्मचारी दोन्ही भाषा जाणणारे असल्याने कसलीच अडचण निर्माण होत नाही.

प्रमाणभाषेच्या ज्ञानाअभावी किंवा दोन्ही भाषांचा वापर बोलीत होत असल्याने लेखन-कौशल्य-विकासात मात्र अडचणी निर्माण होतात. उदा० मराठी व्याकरणात पुल्लिंग, स्त्रीलिंग आणि नपुसलिंग असे तीन प्रकार आहेत. परंतु कन्नड भाषेच्या व्याकरणामध्ये केवळ पुल्लिंग व स्त्रीलिंग असे दोनच लिंगप्रकार दिसून येतात. याशिवाय मराठीप्रमाणे विभक्तिप्रकार नाहीत. त्यामुळे साहित्यनिर्मितीमध्ये इथला सुशिक्षित तरुण काहीसा मागे पडल्याचे दिसून येते. याशिवाय दुसरे कारण म्हणजे त्याच्यावर दोन भाषांचा प्रभाव असतो. परिणामी त्याचा लेखनाकडे फारसा कल असल्याचे आढळून येत नाही. (अलीकडच्या काळात मात्र डॉ० शे०दे० पसारकर, डॉ० सुहास पुजारी, डॉ० राजशेखर हिरेमठ, डॉ० भीमाशंकर बिराजदार अशी काही मंडळी साहित्यसेवेत आहेत, असे दिसते.

■

## महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार

बँक ऑफ महाराष्ट्रच्या सहकार्याने मराठी अभ्यास परिषद गेली ३० वर्षे भाषाविषयक लेखन पुरस्कार देत असते. ₹ ५,०००/- रोख आणि प्रमाणपत्र असे या पुरस्काराचे स्वरूप असते. २०१२चा पुरस्कार डॉ० विलास सारंग यांना 'भाषांतर आणि भाषा' (मौज प्रकाशन, मुंबई) या पुस्तकासाठी देण्यात आला. डॉ० कल्पना कुलकर्णी, डॉ० अशोक जोशी आणि विजया चौधरी (निमंत्रक) या समितीने पुस्तकाची निवड केली. दि० २२ फेब्रुवारी, २०१४ ला झालेल्या या कार्यक्रमात डॉ० कल्पना कुलकर्णी यांनी परीक्षकांच्या वतीने पुस्तकाचा परिचय करून दिला. प्रकृती-अस्वाथ्यामुळे श्री० सारंग हा पुरस्कार स्वीकारण्यासाठी येऊ शकले नाहीत. संस्थेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे यांनी सारंग यांच्या घरी जाऊन त्यांना हा पुरस्कार प्रदान केला.

# रंगी रंगली मराठी

- सुप्रिया सहस्रबुद्धे

रंगपंचमीच्या दिवशी मनात रंगांविषयी विचार करताना इंग्रजी-हिन्दीच्या मानानं मराठी भाषेत रंगांच्या जाणिवा अधिक सूक्ष्म आहेत, असं वाटलं. म्हणजे रंगांच्या छटांबद्दल जागरूकता आहे. नुसतं छटा असं न म्हणता, अशा छटा न दाखवता मराठी भाषा त्या रंगांच्या नकारात्मक व सकारात्मक छटा शब्दाला शब्द जोडून कशी दाखवते, हे पाहणं मनोरंजक आहे.

लालसरमधील लाल रंग लालच्या जवळपास आहे, पण थेट लाल नाही. लालबुंदमध्ये रंगाची धुंद छटा आहे, आवाहकता आहे, थोडी रंगमत्तता आहे. लाल रंगाचा जणू गाभा आहे. लालचुटूकमध्ये गाभा नाही; पण थोडी चमक आहे. लालभडकमध्ये लाल रंगाची नको वाटणारी छटा आहे, निषेध आहे, मर्यादेचा अतिक्रम आणि आक्रमकता आहे. म्हणजे हा लाल रंग कारंज्यासारखा आहे आणि तो रंग उधळतो. लालम लाल या शब्दात कलिंगडाच्या फोडीचा गारवा, रसरशीपणा येतो. लालपणा किती सांगू असा भाव लालेलाल, लालजर्द या विशेषणात आहे. लालची दोन नामं होतात - लाली आणि लालिमा. पण लाली वेगळी आणि लालिमा वेगळा. लालिमा लाडिक काव्यात्म सौंदर्य घेऊन येतो. कवी पु०शि० रेगे जसे 'पुष्कळ' या शब्दाशी मनमुराद खेळतात, त्या खेळात रंगून जातात, तसे लाल या शब्दाशी खेळलेले दिसत नाहीत. तांबडा या ताम्र या संस्कृत भाषेतून आलेल्या शब्दाशी मराठी खेळताना दिसत नाही.

'पांढरा' हा शब्द अगदीच फिका आहे, त्यात जिवंतपणा नाही. पांढराफटक किंवा पांढराफट्ट झाल्यावर तर तो निर्जीवच होऊन जातो. संस्कृतमधून शुभ्र आणून त्याला जोडल्याशिवाय त्याला तेज, शुचिता, पावित्र्य येत नाही. त्यामुळे कांतीच्या वर्णनाला 'गोरा' हा शब्द घ्यावा लागतो. तो शुभ्र जोडल्यावर मात्र जाई, जुई, मोगरा वगैरे फुलं दरवळतात.

पिवळा रंग पिवळा 'गर्द' होत नाही (का बरं?), तर जर्द होतो. तसा पिवळाजर्द किंवा पिवळाधम्मक झाला की एकदम वरणलिंबू, शेवंती नजरेसमोर तरळायला लागतात.

एरवी अंधाराचं प्रतीक असणारा काळा हा शब्द. पण रात्र काळी, घागर काळी, यमुनाजळे काळी असतात तेव्हा हा काळा रंग वेगळ्याच रंगात येतो, गूढगहन होतो. काळाभोर शब्द याची हवीशी छटा दाखवतो. नकारात्मता पुसली जाते. काळेपणाला

तुकतुकी येते. काळा कुळकुळीत किंवा काळाकुट्टमध्ये मात्र एकही अंधुकसा प्रकाशकिरण नसलेली अमावस्येची रात्र एकवटलेली असते. न सांगता 'ट्ट' या जोडाक्षरातून त्याच जोरानं सैतानाचं काळीज दिसायला लागतं. 'काळाशार'मध्ये डोहाचा खोल गूढ काळिमा आहे, त्याच्या आत सात आसरा असतील असं वाटायला लावणारा. या 'काळा'ला सावळा रंग जोडला की काळेपणा कमी होतो. पण हा सावळा निळ्याच्या सावलीत जाऊन निळासावळा झाला की आभाळ भरून टाकतो. जीव वेढून टाकतो. रसिकतेचे पाणी घेतो. अंतरंगात शिरतो, हलकीशी बासरीही वाजवायला लागतो. मेघावर ओठंगतो. निळ्यालाही शार लागला की गहराई येते. निळाई झाली की भारून टाकते, हिरवाईसारखी.

मराठी भाषा हिरव्या रंगाचंही खूप कौडकौतुक करते. ते साहजिकच आहे. 'हिरव्या' शब्दात पावसाचं पाणी ओथंबलेलं आहे. त्याची 'हिरवट' ही छटा मात्र नापसंती घेऊन येते. पिकल्या पानानं हिरवेपणा टाकला पाहिजे, तो टाकला नाही, तर त्याला हिरवट असं उपहासानं म्हटलं जातं. गवत आणि हा रंग इतका एकरूप आहे की इंग्रजीत जसा हिरवळीला 'ग्रीनरी' हा शब्द आहे. तसे मराठीत हिरवळ, हिरवाई हे शब्द येतात. 'हरभरा' म्हणत हिन्दी भाषा हिरव्यातली समृद्धी दाखवते. इंग्रजीत मत्सराला 'मॉन्स्टर' म्हटलं आहे, हे ठीक आहे; पण 'ग्रीन आइड' म्हणण्याचं सयुक्तिक कारण मात्र कळत नाही. मराठीत द्विरुक्तीने तीव्रता दाखवली जाते. लाल लाल, हिरवा हिरवा, पण जणू एवढ्याने या रंगाची उधळण पुरेशी व्यक्त होत नाही म्हणून 'हिरवाकंच', 'हिरवागर्द' हे शब्द येतात. त्यांच्यात दाट झाडी भरूनच राहिली आहे. हिरवागार म्हणून त्याच्यातली शीतलता अधोरेखित केली जाते.

मराठीची ही अशी सुंदर रंगीबेरंगी रंगपंचमीच आहे.

## देणगी

सौ० नीला व श्री० व्ही०एन्० मंत्री यांनी श्रीमती सत्त्वशीला सामंत यांची स्मृती म्हणून मराठी अभ्यास परिषदेला ₹ ५१,०००/- (एकावन्न हजार रुपये)ची देणगी दिली आहे. सौ० नीला मंत्री या सत्त्वशीला सामंत यांच्या भगिनी आहेत.

परिषद सौ० नीला व श्री० व्ही०एन्० मंत्री यांची मन:पूर्वक ऋणी आहे.

परीक्षण

# भाषांतरकारांना आणि साहित्याभ्यासकांना उपयुक्त

- कल्पना कुलकर्णी

[ भाषांतर आणि भाषा : डॉ० विलास सारंग, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे : १३४, किंमत : ₹ १५०/- ]

भाषांतराच्या मार्गानं भाषाभाषांमधील अंतर पार करून ज्ञानाचं संक्रमण वेगानं करण्याची गरज आज जगात सर्वत्र आणि जीवनाच्या सर्व क्षेत्रांत भासते आहे. भाषांतराचं महत्त्व इतकं वाढलं आहे की त्याला स्वतंत्र ज्ञानशाखेचा दर्जा प्राप्त झाला आहे. जगातील बहुतेक सर्व मुख्य भाषांतील ग्रंथांची, पुस्तकांची इंग्रजी भाषांतरं आज उपलब्ध आहेत. मूळ भाषा जरी येत नसली तरी इंग्रजीमार्गे पुस्तकं आपण मराठीत आणू शकतो. इंग्रजीचं सान्निध्य आपल्याला दीर्घ काळ लाभलेलं आहे. इंग्रजीशी संवाद वाढवून तिचा उपयोग आपण मराठीच्या संवर्धनासाठी करून घेऊ शकतो. पण यांत्रिक, शब्दशः भाषांतर म्हणजे चांगलं भाषांतर नव्हे. चांगलं भाषांतर कसं असलं पाहिजे, भाषांतरकारानं वेगवेगळ्या संदर्भातल्या भाषांचा पोत, कस जाणला पाहिजे, कुठली पथ्यं पाळली पाहिजेत. आणि कुठल्या चुका टाळल्या पाहिजेत याचा वस्तुपाठ म्हणजे डॉ० विलास सारंग यांचं 'भाषांतर आणि भाषा' हे पुस्तक आहे. 'भाषांतराची चिकित्सा' असं त्याचं स्वरूप आहे. भाषांतराबद्दल मार्गदर्शन करणारं, अस्तित्वात असलेल्या भाषांतरांची समीक्षा करणारं असं लेखन मराठीत तरी दुर्मीळ आहे.

पुस्तकाचा विषय हा वाङ्मय किंवा साहित्यकृतींच्या भाषांतराशी निगडित आहे. या पुस्तकाच्या निर्मितीत लेखकाच्या अनेक क्षमता कार्यान्वित आहेत असं आपल्या लक्षात येतं. लेखक स्वतः द्विभाषिक आहे. मराठी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांवर त्यांचं समान प्रभुत्व आहे. दोन्ही भाषांतील साहित्य आणि समीक्षा याचं त्यांना सखोल ज्ञान आहे. ग्रे, ऑडन, इलियट, येट्स्, हेमिंग्वे इ० कित्येक इंग्लिश साहित्यिक आणि मर्ढेकर, चित्रे, अरुण कोलटकर, इंदिरा संत, पु०ल० देशपांडे इ० मराठी साहित्यिकांच्या साहित्यातील भरपूर अवतरणे या पुस्तकात आली आहेत. केवळ विद्वत्ता आणि पांडित्यातून आलेली कोरडी चर्चा येथे नाही. लेखक स्वतः रसिक वाचक/वाङ्मयाचा आस्वादक आणि सर्जनशील लेखक आहे. त्यामुळे वाङ्मय-निर्मितीच्या प्रक्रियेतील सर्व खाचा-खोचा, कलाकृतीतली बारीक-सारीक सौंदर्यस्थळे आणि दोषही ते सहजपणे टिपू शकतात. लेखक स्वतः भाषांतरकारही आहेत. त्यामुळे मूळ संहितेतील सूक्ष्म अर्थ आणि सौंदर्यछटाही

भाषांतरात आल्या पाहिजेत असे ते आग्रहाने सांगतात. पण त्यात येणाऱ्या अडचणींची आणि समस्यांचीही त्यांना जाणीव आहे. शिवाय 'भाषा' या व्यवस्थेचंही शास्त्रशुद्ध ज्ञान त्यांना आहे. पुस्तकातील मजकुराची मांडणी ही भाषाशास्त्राच्या तत्त्वानुसार केली आहे. पुस्तकाचा प्रवास हा भाषेच्या अत्यंत स्थूल, ठळक स्तराकडून म्हणजे वाक्य/व्याकरणाकडून शब्द, ध्वनीमार्गे भाषेच्या तुलनेने सूक्ष्म, आकलनाला गुंतागुंतीच्या असणाऱ्या अर्थस्तराकडे होतो. थोडक्यात वाङ्मयीन लेखनशैलीचं हे भाषावैज्ञानिक विश्लेषण आहे (भाषांतराच्या संदर्भात लेखकाला शैलीविज्ञानही अवगत आहे असं स्पष्ट होतं.) थोडक्यात भाषांतर - विशेषतः वाङ्मयीन कलाकृतींचं भाषांतर हा एक आंतरज्ञानशाखीय अभ्यास-विषय म्हणून येतं.

या पुस्तकातलं सर्वांत मोठं प्रकरण हे शब्दकळेला वाहिलेलं आहे. मराठी व इंग्रजी दोन्ही भाषांचं कुल भारत-युरोपीय असल्यामुळे शब्दसंपदेच्या बाबतीत त्या दोहोंत बरंच साम्य आहे. दोन्ही भाषांचा शब्दसंचय दोन प्रकारात विभागता येतो. (१) अभिजात, औपचारिक, पंडिती भारदस्त शैलीसाठी इंग्रजीत लॅटिन-आधारित शब्द आहेत तर मराठीत संस्कृत-आधारित (२) इंग्रजीतल्या अनौपचारिक, बोलभाषिक अँग्लो-सॅक्सन शब्दांना समांतर मराठीत एतद्देशीय किंवा अरबी-फारसी भाषांतून आलेले शब्द आहेत. या समांतर वैशिष्ट्यांचा उपयोग भाषांतरकार करू शकतो. सारंगानी स्वतः एलियटच्या 'द हॉलो मेन' या कवितेचं मराठीत भाषांतर केलं आहे. या कवितेत एलियटनं लॅटिन भाषेच्या मदतीनं नवीन इंग्रजी शब्द तयार केले आहेत. इंग्रजीत याला निऑलॉजिझ्म असं म्हणतात. 'मल्टीफोलिएट रोझ' असा एक शब्दप्रयोग आहे. 'अ रोझ विथ इन्युमेरबल लीव्हज्' असा पसरट प्रयोग टाळून एलियटनं एकच गोळीबंद, अभिजात सौंदर्य असलेला शब्द घडवला आहे. हा सगळा अभिजातपणा, पकडायला सारंगांनीही संस्कृत-आधारित एकच शब्द वापरला - 'असंख्यपर्णांकित'.

भाषांतरात शब्दांची निवड किती चोखंदळ असली पाहिजे हे सारंग स्वानुभवावरून दाखवून देतात. अशा वेळी भाषांतर ही वाङ्मयनिर्मितीइतकीच सर्जक कला म्हणून आपल्यापुढे येते. भाषांतराचे निरनिराळे पैलू, भाषांतरातल्या खुब्या यांचे आकलन आणि शोध कधी संपत नाही. पण ही शोध-यात्रा तशी सोपीही नाही. कितीतरी अनपेक्षित समस्या, पेच भाषांतरकाराच्या मार्गात येतात. संहितेशी प्रामाणिक बांधिलकी हे भाषांतराचं प्राथमिक तत्त्वच मोडून पडतं. बऱ्याच वेळा भाषांतरकाराच्या स्वतःच्याच आवडी-निवडींची, व्यक्तिमत्त्वाची छाया भाषांतरावर पडते. मूळ संहितेबद्दलचा वस्तुनिष्ठ दृष्टिकोण हरवून जातो. थोड्याशाही निष्काळजीपणानं अर्थाची हानी घडते. या संदर्भात सारंगांनी पु०ल० देशपांडे यांनी केलेल्या हेमिंग्वेच्या 'दि ओल्ड मॅन ॲण्ड द सी'च्या भाषांतराचे उदाहरण दिले आहे. वर वर पाहता विरामचिन्हं, अपसरणचिन्हं, टिंब टिंब अर्थाच्या दृष्टीनं फारशी

महत्त्वाची वाटणार नाहीत. हेमिंग्वेच्या संपूर्ण कादंबरीत फक्त दोन उद्गारचिन्हं आहेत. उलट पु०लं०च्या भाषांतरात उद्गारचिन्हांची मुक्त हस्ताने उधळण आहे. कदाचित निवेदनात बोलभाषेची गंमत, नाट्य आणण्याचा त्यांचा उद्देश असेल. पण त्या नादात मूळ संहितेचा तटस्थ, शांत, मंद स्वर हरवून जातो. देवमाशाबरोबरच्या संघर्षात पराभवही स्थितप्रज्ञ वृत्तीनं स्वीकारणारा हेमिंग्वेचा म्हातारा पु०लं०च्या 'एका कोळियात' सापडत नाही.

ग्रंथाच्या समारोपात सारंग म्हणतात, ''या ग्रंथात भाषेवर सूक्ष्मदर्शक भिंग लावण्याची कुवतीनुसार पराकाष्ठा केली आहे.'' सारंगांची ही कुवत म्हणजे पराकोटीची संवेदनशीलता, सर्जनशीलता, भाषाप्रभुत्व, वाङ्मय आणि समीक्षेची सखोल जाण, भाषाविज्ञान आणि शैलीविज्ञानातलं नैपुण्य - या साऱ्या क्षमतांचं रसायन आहे. या अनेकविध पैलूंमुळे सारंगाचं हे भिंग अतिशय सूक्ष्मदर्शी झालं आहे. भाषांतरकार या भिंगाच्या माध्यमातून आत्मपरीक्षण करू शकतील. शिवाय भाषा, वाङ्मय, समीक्षा, भाषाविज्ञान आणि शैलीविज्ञानाच्या अभ्यासकांनाही ते मार्गदर्शक ठरू शकेल.

■

(महाबँक भाषाविषयक पुरस्कार-वितरणाच्या कार्यक्रमातील भाषणाचा संपादित अंश)

## दुर्लक्षित मुद्रितशोधक

चांगला मुद्रितशोधक होणे ही वाटते तेवढी सोपी गोष्ट नाही. त्यासाठी सर्व विषयांवरील प्रचंड वाचन, अभ्यास, मूलतः च संस्कार होण्याच्या वयापासून शुद्धलेखनाचे गुण अंगी असणं, शब्दसंचयाची वृत्ती आणि सतत शिकण्याचा व चुका सुधारण्याचा ध्यास असावा लागतो. असा मुद्रितशोधक लाभल्यावर चांगल्या साहित्याचे तेज आणखी लखलखून उठते; अन्यथा जेवणात प्रत्येक घासाला खडा वा केस लागल्यासारखे होते आणि चांगल्या साहित्यकृतीतील आनंद घेण्याच्या भावनेचा विरस होतो.

परंतु, हा मराठी साहित्यनिर्मितीतील महत्त्वाचा घटक आजपर्यंत अत्यंत दुर्लक्षित राहिला आहे. प्रशिक्षण देणाऱ्या योग्य व्यक्ती नाहीत; मग या क्षेत्राकडे कोण वळणार? सर्वात महत्त्वाची बाब म्हणजे या क्षेत्रात येऊन त्यात निपुण होण्यासाठी बराच काळ द्यावा लागतो. एवढे करूनही कुटुंबाची उपजीविका चालवू शकेल, इतके उत्पन्न वा वेतन त्याला मिळते का? तर, खेदाने म्हणावे लागते - नाही.

(मिलिंद बोरकर, साधना (साप्ताहिक), ०८ मार्च २०१४)





अनुक्रमणिका

# औंध.इन्फो

- सुशान्त शंकर देवळेकर

व्यंकटेश माडगूळकरांच्या 'बनगरवाडी' ह्या कादंबरीत औंध संस्थान आणि औंधचा राजा ह्यांच्याविषयी आलेले उल्लेख अनेकांना आठवत असतील. सातारा जिल्ह्यातील औंध हे पूर्वीच्या काळातील संस्थानाच्या राजधानीचे गाव. आज बहुतेकांना हे गाव माहीत असते ते श्री भवानी चित्रसंग्रहालय ह्या संग्रहालयामुळे. अनेक पर्यटक हे संग्रहालय पाहण्यासाठी आवर्जून औंध येथे जातात. ह्या गावाविषयी, त्याच्या इतिहासाविषयी, सद्य:स्थितीविषयी माहिती देणारे औंध.इन्फो (http://www.aundh.info) हे संकेतस्थळ नक्कीच पाहण्याजोगे आहे. हे संकेतस्थळ मराठी आणि इंग्लिश अशा दोन्ही भाषांत रचलेले आहे. त्यापैकी मराठीतील संकेतस्थळाविषयी माहिती पुढे दिली आहे.

संकेतस्थळावर 'जगाच्या नकाशावर' ह्या भागात औंधला कसे पोहोचता येईल ह्याची माहिती पुरवली आहे. विविध ठिकाणांहून असलेली अंतरे, उपलब्ध असलेल्या बससेवा, रेल्वेसेवा, विमानसेवा ह्यांची सविस्तर माहिती वेळापत्रकासकट दिली आहे. गूगलचा नकाशाही ह्या पानावर जोडला आहे. औंधला जाऊ इच्छिणाऱ्या पर्यटकांसाठी ही माहिती निश्चितच उपयुक्त आहे.

'भौगोलिक' ह्या विभागात औंध ह्या गावाची सध्याच्या भौगोलिक स्थितीची माहिती दिलेली आहेच; पण औंध हे संस्थान असताना त्याची व्याप्ती किती होती, त्यात कोणकोणत्या तालुक्यांचा समावेश होता ही माहितीही पुरवली आहे.

'इतिहास' ह्या विभागात औंधसंबंधीच्या पौराणिक कथेपासून आधुनिक काळापर्यंतचा इतिहास संक्षेपाने मांडला आहे. औध संस्थानाची स्थापना, पंतप्रतिनिधी ही पदवी धारण करणाऱ्या औंधच्या विविध कालखंडातील राजांची माहिती आणि आधुनिक काळातील औंध ह्यांविषयीची माहिती ह्या विभागात उपलब्ध आहे.

श्री० भवानराव तथा बाळासाहेब पंतप्रतिनिधी (१८६८-१९५१) ह्यांच्यामुळे आज औंध संस्थान अधिक प्रसिद्ध आहे. त्यांची सविस्तर आणि सचित्र माहिती एका पानावर पुरवली आहे. त्यात त्यांचे संक्षिप्त चरित्र, त्यांनी केलेले कार्य, त्यांचे लेखन, चित्रकला, शिल्पकला, कलेच्या संवर्धनासाठी तसेच लोककल्याणासाठी राबवलेले विविध उपक्रम ह्यांविषयीची माहिती देण्यात आली आहे. त्यांच्या लेखनातील काही निवडक वेचेही ह्या ठिकाणी देण्यात आले आहेत.





अनुक्रमणिका

बाळासाहेब पंतप्रतिनिधी ह्यांचे चिरस्मरणीय कार्य म्हणजे त्यांनी उभारलेले श्री भवानी चित्रसंग्रहालय. देशविदेशांतील चित्रकारांची चित्रे (रंगचित्रे), आणि शिल्पकारांची शिल्पे ही त्यांना मोबदला देऊन पंतप्रतिनिधींनी विकत घेतली. त्यांचे एक स्थायी संग्रहालय निर्माण केले. एका स्वतंत्र पानावर ह्या संग्रहालयाचा इतिहास, त्यातील वैशिष्ट्यपूर्ण संग्रह ह्यांची सचित्र माहिती देण्यात आली आहे. संग्रहालय पाहण्याच्या वेळा, त्यासाठीचे शुल्क ही पर्यटकांना उपयुक्त असलेली माहितीही ह्या पानावर दिली आहे.

बाळासाहेब पंतप्रतिनिधींचे आणखी एक कार्य म्हणजे साष्टांग सूर्यनमस्कार ह्या व्यायामप्रकाराचा प्रसार. त्यासाठी त्यांनी राबवलेल्या उपक्रमांची माहिती एका पानावर पुरवण्यात आली आहे. ह्याच पानावर पंतप्रतिनिधींची सूर्यनमस्काराची पद्धत छाया-चित्रांच्या साहाय्याने समजावून दिली आहे.

'वैशिष्ट्ये' ह्या विभागात औंधमधील विविध संस्था, प्रेक्षणीय स्थळे, देवालये, शाळा, बाजार, विविध समाज ह्यांविषयी माहिती पुरवली आहे. औंधमधील यात्रा त्यांचे संस्थानाच्या काळातील स्वरूप आणि सध्याचे स्वरूप ह्याची सविस्तर माहिती 'कार्यक्रम' ह्या शीर्षकाच्या विभागात दिली आहे. तिथेच इतर सांस्कृतिक कार्यक्रम, नैमित्तिक उपक्रम ह्यांचीही माहिती दिलेली आहे. 'सेवा सुविधा' ह्या विभागात औंधमधील रुग्णालये, औषधांची दुकाने, निवासाच्या सोयी, महत्त्वाचे दूरध्वनी क्रमांक अशी उपयुक्त माहिती संकलित केलेली आहे.

संकेतस्थळाची रचना विचारपूर्वक केलेली आहे. त्यासाठी पुरेसे कष्ट घेतलेले आहेत ह्याची जाणीव हे संकेतस्थळ पाहताना होते. संकेतस्थळाचे दृश्य रूप चांगलेच आकर्षक आहे. पुरवलेली माहितीही चांगली आहे. बहुतांश मराठी संकेतस्थळांवर आढळणाऱ्या शुद्धलेखनविषयक ढिसाळपणाचे काही नमुने इथेही आढळत असले तरी औंधविषयी उत्तम माहिती हे संकेतस्थळ पुरवते. छायाचित्रांचा उत्तम वापर करण्यात आला आहे. एखाद्या व्यक्तीला पर्यटनासाठी औंधला जायचे असेल तर तिला आवश्यक ती सर्व माहिती हे संकेतस्थळ पुरवते.

भवानराव पंतप्रतिनिधींच्या कार्याची उत्तम माहिती ह्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आली आहे. ह्या विभागात भवानराव पंतप्रतिनिधींचे लेखन निदान पीडीएफ स्वरूपात जर उपलब्ध करून देण्यात आले तर ह्या संकेतस्थळाच्या वैशिष्ट्यांत अधिक भर पडेल.

■

प्रतिसाद-१

## ‘ओ/वो/थंबा’

आपल्या २०१३च्या दिवाळी अंकात (वर्ष ३१, अंक ४) श्री०मा० भावे यांनी पृ० ५८वर ‘ओ/वो/थंबा’ ह्या यादवकालीन मराठी शब्दाचा अर्थ सांगितला आहे. तो ‘रेफरी’ म्हणून पूर्वीपासून वि०भि० कोलते, ह०ना० नेने वगैरे महानुभाव साहित्याचे संपादक सर्वच वापरत आले आहेत.

तुळपुळे आणि फेल्डहाउस कृत ‘अ डिक्शनरी ऑफ ओल्ड मराठी’ (१९९९) मध्येही हाच अर्थ दिला आहे. अर्थात वेरूळच्या शिल्पावरून हाच अर्थ काढणे उत्तमच आहे.

कळावे. ■

भालचंद्र नेमाडे

प्रतिसाद-२

## वर्किंग लंच

मागच्या काही अंकांमधून चर्चेत आलेले आणि ‘वर्किंग लंच’ यासाठी सुचविले गेलेले काही पर्याय पाहिल्यानंतर माझ्या मनात आलेला शब्द सुचवावासा वाटतो. ‘वर्किंग लंच’ हा शब्द अशा जेवणाला वापरला जातो की, ज्यामध्ये जेवणाला फार महत्त्व नसते. असे जेवण केवळ चर्चेच्याच वेळी घेतले जाते असे नाही. कोणत्याही सामूहिक अथवा गटउपक्रमाच्या वेळीही असे भोजन घेतले जाते. कारण त्या वेळी कामाचा वेळ जेवणासाठी न दवडता तो वेळ वाचवण्यासाठी कामचलावू जेवण दिले जाते. माझ्या मते ‘वर्किंग लंच’साठी ‘कामचलावू जेवण’ अथवा ‘कामचलावू भोजन’ असे शब्द अधिक सयुक्तिक ठरतील. ‘कामचलावू’ हा शब्द काम चालवून नेणारा याअर्थी वापरला जातो. जेव्हा उदरभरणाचे काम अशा भोजनाने चालवून नेले जाते तेव्हा हा अर्थ व्यक्त करण्यासाठी वरील शब्द अधिक समर्पक वाटतील असे मला वाटते. शिवाय हे शब्द तसे प्रचलित असल्याने भाषेत सहज रुळून जातील. ■

डॉ० विद्या प्रभुदेसाई
चलभाष : 94220 61000

प्रतिसाद-३

## इंग्रजी शब्दांचे 'ग्रामिणायझेशन'

समावेशकता हा गुण भाषेला जिवंत व व्यापक बनवत असतो. तिच्यात इतर भाषांमधून अनेक नवनवीन शब्द अंतर्भूत करण्यात येतात व ही शब्दसरिता त्यांनाही घेऊन पुढे मार्गक्रमण करीत असते. तसेच काही शब्द तिच्यातून बाहेर जाऊन आणखी कुणा एका भाषेला समृद्ध करीत असतात. त्याच संदर्भात काही इंग्रजी शब्दांचे ग्रामीण भागात जे 'ग्रामिणायझेशन' झालेले आढळले ते मजेशीर वाटले. जसे :

| | |
|---|---|
| पाहुणे 'हल्टींग गाडी' ने येणार. | (Halting) |
| पाहुण्यांना 'शिंगलभर' चहा करणे. | (Single) |
| कुणीतरी 'अठराशेटी'चा आरोप लावणे. | (Atrocity) |
| 'याटो' येणे. | (Auto) |
| 'ठेसनात' गाडी येणे. | (Station) |
| चार 'बुकं' शिकणे. | (Books) |
| लग्नाचं 'कारडं' येणे | (Card) |
| 'बॅका' उचलणे. | (Bags) ■ |

डिंपल दा० मापारी, इंग्रजी विभाग, शंकरलाल खंडेलवाल महाविद्यालय, अकोला.

प्रतिसाद-४

## माणूस : 'मराठी' की 'महाराष्ट्रीय'?

अलीकडच्या काळात बोकाळलेला 'मराठी माणूस' हा शब्दप्रयोग मला खटकतो. अर्थात बंगाली भाषकांना सामान्यतः बंगाली म्हटले जाते किंवा त्यांना 'बंगाली माणसे' असेही म्हटले जाऊ शकते. पण एखाद्या हिंदीभाषकाला 'हिन्दी माणूस' असे संबोधिले जात नाही. मराठी-भाषकांकरिता पारंपरिक संबोधनात्मक शब्द 'महाराष्ट्रीय' हा आहे, असे मला वाटते. भाषा मराठी असू शकते; किंबहुना आहेच. पण माणूस कसा 'मराठी' असू शकेल? माणूस तो माणूसच! माझ्या या शंकेचे आपण किंवा इतरेजन निरसन कराल/करतील का? ■

सुकुमार शिदोरे, सी-5/3-D/14, न्यू अजंठा अव्हेन्यू, पौड रोड, कोथरूड, पुणे 411 0029.

चलभाष : 94225 26648 ई-पत्ता : sukumarshidore@yahoo.com





अनुक्रमणिका

# लेखकांच्या शोधात काही विषय

[पुढील विषयांवरील लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे.]

आंतरभाषिक विवाहातले अनुभव

चित्रकला / मूर्तिशिल्प / वास्तुशिल्प यांच्याबद्दल मराठीत लिहिताना येणाऱ्या परिभाषेच्या अडचणी

भाषा आणि विचारप्रक्रिया

मराठीच्या अध्यापनाचा कस कसा वाढवता येईल?

नागपूरच्या मराठीवर हिंदीचे संस्कार

पुरुषांची भाषा

भाषिक नियोजन

प्रयोगजीवी कलांबद्दल मराठीत लिहिताना -

परप्रांतातील / परदेशातील मराठीभाषकांचे प्रश्न

मनोरुग्णाशी मराठीतून संवाद साधताना -

हस्ताक्षर रोजचे आणि सणासुदीचे

मराठी बोलणे / लिहिणे - सरळ आणि तिरकस

जेव्हा कामगार / आदिवासी / पीडित स्त्रिया बोलू लागतात तेव्हा...

बोलणे आणि गाणे

दृश्य-श्रव्य साधने आणि लोकशिक्षण

जुन्या मराठीतले काही अर्थवाही (आणि म्हणून पुनरुज्जीवन करण्याजोगे?) शब्द

भाषेचा नाद

कोण म्हणतो मराठीत सकस विचार मांडता येणार नाहीत?

भाषेचा दलितपणा

सामान्य माणसापर्यंत वैज्ञानिक दृष्टिकोण कसा पोचवता येईल?

कोल्हापुरी मराठीचा ठसका आणि गोडवा

सामाजिक परिवर्तन आणि भाषिक परिवर्तन

पंडिती वळण आणि शाहिरी वळण

जाहिरातीमधील मराठी

चित्रपटाची / रंगभूमीची भाषा

चित्रपटामधील / रंगभूमीवरची भाषा

नाटकाची रंगावृत्ती तयार करताना
चित्रांची भाषा आणि कवितांची भाषा
व्यावसायिक पदवीधर (कायदा, वैद्यक, वाणिज्य, शेतकी, तंत्रविद्या, अभियांत्रिकी) आणि मराठी
लहान मुले भाषा कशी शिकतात? (काही अवलोकने)
कायदेशीर दस्तऐवजांची भाषा
मुलाखत - एक देणे
रामदासांची / एकनाथांची भाषा
मराठी भाषकांचे इंग्रजी अधू का आणि कसे?
महानुभाव गद्याची भाषा
माझे मराठी भाषेशी प्रेमप्रकरण (परभाषा बोलणाऱ्याचे)
माझी माय, माझी मावशी (कोकणी भाषकाच्या दृष्टिकोणातून)
न्यायालयीन कामकाज आणि मराठी (का यावी? कशी असेल?)
ग०दि०मा० आणि भाषेची गेयता
कथा वाचायची आणि ऐकायची
कादंबरीची भाषा आणि...
जुन्या मराठी गीतांचा गोडवा आणि आर्तता
पूर्वप्राथमिक / प्राथमिक / माध्यमिक अवस्थेतील मराठीचे अध्यापन
इंग्रजीतून मराठीत / मराठीतून इंग्रजीत /हिंदीतून मराठीत / संस्कृतमधून मराठीत अनुवाद करताना
जाहिरात-बोलपट आणि मराठी भाषा
लघुनियतकालिके : एक फलश्रुती - भाषिक दृष्टीने
ग्रामीण साहित्याची भाषा
टिळकांचे मराठी आणि आगरकरांचे
फुल्यांचे मराठी
शिरवाडकरांचा मॅक्बेथचा अनुवाद : एक भाषिक परीक्षण
मुस्लिम / ख्रिस्ती महाराष्ट्रीय आणि मराठी भाषा
संस्कृत शब्दांचा जुन्या मराठीतील अवतार
भाषाशिक्षणाबद्दलच्या प्रयोगांचे अनुभवकथन
विवेचक गद्य
शालेय / महाविद्यालयीन पाठ्यपुस्तके ■

(भाषा आणि जीवन ३:२ / उन्हाळा १९८५मधून)




अनुक्रमणिका

# भाषा आणि जीवन : लेखनसूची २०१३

- विजय पाध्ये

## लेखक

## लेख

## लेख

## सदरे

## लेखक-परिचय

■ **काटीकर,** आनन्द (डॉ०) : एम०ए०, पीएच०डी० (प्रबंधाचा विषय 'भाषा आणि जीवन : एक अभ्यास'), औषधनिर्माणशास्त्राची पदविका, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे अध्यापन.
टपाल-पत्ता : बी - 5/16, सनसिटी, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.
स्थिरभाष : (020)2430 1743, चलभाष : 094216 10704,
ई-पत्ता : anand.katikar@gmail.com

■ **कुलकर्णी,** कल्पना (डॉ०) : महाविद्यालयीन व विद्यापीठ स्तरावर इंग्रजीचे अध्यापन, निवृत्त, पुणे विद्यापीठाचा इंग्लिश विभाग व ब्रिटिश कॉन्सिल यांच्या संयुक्त प्रकल्पात सहभाग.
टपाल-पत्ता : ए-11, सूर्यप्रकाश अपार्टमेंट्स, मार्केटयार्ड रस्ता, पुणे 400 037.
चलभाष : 098904 66067

■ **कोळी,** संजयकुमार (डॉ०) : एम०ए०, पीएच०डी०, फर्ग्युसन महाविद्यालयात अध्यापन.
टपाल-पत्ता : मराठी विभाग, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे 411 004.
चलभाष : 098905 34327

■ **जोशी,**कल्याण : एम०एस्सी०(संख्याशास्त्र). एका खासगी संस्थेत संख्याशास्त्रीय सल्लागार. शिवाय, सध्या पुणे विद्यापीठात यंत्रसिद्ध भाषांतरासंबंधी संशोधन करीत आहेत. इंग्रजीतून मराठी भाषांतर व अन्य सदरे असणाऱ्या 'साकव' ह्या संकेतस्थळाची निर्मिती व व्यवस्थापन यात प्रमुख सहभाग.
ई-पत्ता : kalyanjoshi@gmail.com

■ **जोशी,** मृदुला : एम०ए०(मराठी), १९६६पासून पॉप्युलर प्रकाशनाच्या संपादकीय साहाय्यक व ग्रंथसंपादक म्हणून अनेक वर्षे काम. १९९५ ते २०१० मुंबईच्या 'एशियाटिक जर्नल'च्या संपादनसहायक व मुद्रितशोधक, 'प्रिय सुहृद', 'प्रभुराम', दिनकर केळकर ऊर्फ कवी अज्ञातवासी यांचे (इंग्रजी) चरित्र, 'अभिजन प्रियजन' इ० पुस्तके प्रकाशित. संत नामदेव पुरस्कार (इ०स० २०००), दिल्लीच्या फेडरेशन ऑफ इंडियन पब्लिशर्सकडून 'डिस्टिंग्विश्ड एडिटर', हा सन्मान, 'कै० भगवान मानकर साहित्यसेवा सुवर्णपदक सन्मान.
टपाल-पत्ता : ए 2/8, सुमननगर, वि०ना० पुरव मार्ग, चेंबूर, मुंबई 400 071.
चलभाष : 098199 39133, ई-पत्ता : mrudulapj@gmail.com

■ **देवळेकर,** सुशान्त : राज्य मराठी विकास संस्थेत कनिष्ठ संशोधन-साहाय्यक पदावर कार्यरत. 'मराठी शाब्दबंध' हा कोश व मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी संगणक-प्रणाली विकसित करण्यात सहभाग.
टपाल-पत्ता : D-605, सुबोधसागर वसाहत, श्रीप्रस्थ चौथा मार्ग, निळेमोरे, नालासोपारा. ता० वसई, जि० ठाणे 401 203.
चलभाष : 097698 35310





अनुक्रमणिका

■ **प्रभुदेसाई,** विद्या वासुदेव (डॉ०) : एम०ए०.एम०फिल०.पीएच०डी०. पी०ई० सोसायटीचे महाविद्यालय. फोंडा येथे मराठीच्या विभाग-प्रमुख. अनेक नियतकालिकांतून संशोधनपर लेख प्रकाशित.
टपाल-पत्ता :पी०ई० सोसायटीचे महाविद्यालय. फोंडा. गोवा. चलभाष : 098229 16537

■ **पातुरकर,** शुभांगी (डॉ०) 'मराठी मुक्तछंद' या विषयावर पीएच०डी० त्याच शीर्षकाचे पुस्तक १९९९मध्ये प्रकाशित. त्याला ग्रंथोत्तेजक सभा (पुणे). विदर्भ साहित्य संघ (नागपूर) यांचा म० म० वा० वि० मिराशी पुरस्कार व विदर्भ संशोधन मंडळ (नागपूर) यांचा डॉ० बाळाजी पुरस्कार. 'मंतरलेले दिवस' (२००३) हा ललितलेखांचा संग्रह प्रकाशित.
टपाल पत्ता डी 9. स्प्रिंग फ्लॉवर्स सहनिवास. पंचवटी. पाषाण. पुणे 411 008.
चलभाष 098703 10534. ई-पत्ता shubhangipaturkar@gmail.com

■ **पाध्ये,** विजय पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८ पासून विविध उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन, औद्योगिक संबंध. विकृतिशास्त्र. दूरसंचार इ० क्षेत्रांतील दस्तऐवजांचे इंग्रजीतून मराठीत भाषांतर करण्याचे काम स्वतंत्रपणे करतात.
टपाल पत्ता : 4 चित्रा 'बी'. विद्यासागर सोसायटी. बिबवेवाडी. पुणे 411 037.
स्थिरभाष : (020)2441 1951. चलभाष : 098220 31963
ई-पत्ता : v.wordsmith@gmail.com

■ **राजर्षि,** मनोहर (डॉ०) : पुणे विद्यापीठातून संख्याशास्त्राचे प्रोफेसर म्हणून निवृत्त.
ई-पत्ता : m.b.rajarshi@gmail.com. चलभाष : 095450 18482

■ **सहस्रबुद्धे,** सुप्रिया (डॉ०) : मॉडर्न महाविद्यालय (पुणे) येथून इंग्रजीच्या प्रपाठक म्हणून निवृत्त. " 'इलियड'. व 'ओडिसी'. आणि 'महाभारत' या महाकाव्यांतील स्त्री-व्यक्तिरेखांचा तुलनात्मक अभ्यास." हा पीएच०डी०चा विषय. पाच विद्यार्थ्यांना पीएच०डी०साठी मार्गदर्शन. सहा विद्यार्थ्यांचे पीएच०डी०चे काम चालू. अमर्त्य सेन यांचे 'आयडेंटिटी अँड व्हायलन्स' आणि ज्योतिर्मय शर्मा यांचे 'हिंदुत्व' या पुस्तकांचे मराठी भाषांतर (पेंग्विन इंडिया प्रकाशन, दिल्ली). प्रशांत अयंगार यांच्या 'योगविद्या प्रवचनमाला' व 'ऐंद्रीय अवयव शास्त्र' या मराठी पुस्तकांचे इंग्रजी भाषांतर (योग प्रकाशन, मुंबई). मीरा तारळेकर यांच्या 'आदिमाया' या कवितासंग्रहाचे हिंदी भाषांतर (सरस्वती प्रकाशन. अलाहाबाद). 'तमसेवरचे काव्यतरंग' इंग्रजी कवितांचे मराठी भाषांतर. जी०ए० कुलकर्णी यांच्या पाच कथांचे हिंदी भाषांतर. 'भारतीय स्त्रियांचे इंग्रजीतील लेखन' ह्या प्रकल्पात लेखन व भाषांतर सहभाग.
ई-पत्ता : supriya_yoga@yahoo.com चलभाष : 098225 29033

■ **क्षीरसागर,** हेमा (डॉ०) : एम०ए० (संस्कृत). एम०एड०, पीएच०डी०. टिळक शिक्षण महाविद्यालय (पुणे) येथून प्रभारी प्राचार्य म्हणून निवृत्त. 'जीवनमृत्यूच्या सीमेवरून'. 'बाराव्या शतकातील खाद्यसंस्कृती' 'बिंब-प्रतिबिंब' इत्यादी पुस्तकांचे लेखन. प्रबंधासाठी व लेखनासाठी काही पुरस्कार प्राप्त.
टपाल-पत्ता 1294. शुक्रवार पेठ. सातवा रस्ता. सुभाषनगर. पुणे 411 002.
चलभाष 094227 70663



**मराठी अभ्यास परिषद पत्रिका**

वर्ष ३२ । अंक २ । उन्हाळा (एप्रिल) २०१४

मूल्य ₹ ४०/–

---

**प्रेषक:**

कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद

c/o वाच. आनंद काटीकर, बी. ५/१६, सनसिटी, सिंहगड रोड

आनंदनगर, पुणे ४११०५१ ☎– ०९४२१६१०७०४

e-mail: marathi.abhyas.parishad@gmail.com

---

Book Packet Containing Periodical

**बुकपोस्ट – बुकपॅकेट – त्रैमासिक**

**विद्वत्–प्रमाणित त्रैमासिक**

आर. एन. आय. नोंदणी क्र. Q-40048/83,

ISSN 2231-4059 Marathi Abhyas Parashid Patrika